# विराणी

लेखक

पं. महादेवशास्त्री जोशी



सन
१९५०

जोशी ब्रदर्स बुकसेलर्स
६७८ सदाशिव पेठ, पुणें २.

मूल्य अडीच रुपये

# अर्पणपत्र

मित्रवर्य श्रीयुत

बा. द. सातोस्कर

यांस सप्रेम समर्पित.

—लेखक

हा माझा तिसरा कथासंग्रह. 'ाडकांतले पाझर' याच्या पाठोपाठ दुसऱ्याच वर्षी प्रकाशांत येत आहे, याचें सगळें श्रेय, प्रकाशक श्री. केशवराव जोशी यांना देऊन मी मोकळा होतों. त्यांच्या घाईला सुलभ मुद्रणालयाचे व्यवस्थापक श्री. राजाभाऊ सरनाईक यांनीं साथ दिली म्हणूनच या 'विराणी'ला दसऱ्याच्या दिवशीं सीमोल्लंघन करतां आलें.

'विराणी' या नांवाबद्दल बऱ्याच मित्रांनीं जिज्ञासा व्यक्त केली, कीं हें काय प्रकरण आहे ? यांतल्या पहिल्या गोष्टीचें तें नांव आहे, हें सर्वांना कळेलच. विराणी म्हणजे विरहिणी. गोकुळांतल्या गौळणींच्या विरहावस्थेचें वर्णन करणारीं जीं अनेक पदें संतवाङ्मयांत आहेत त्यांना 'विराण्या' असें बहुवचनी नांव रूढ आहे. प्राकृत वाङ्मयांतले सुंदर, सुटसुटीत आणि अर्थगुरु असे शब्द वेंचून वापरण्याचा मी थोडासा प्रयत्न करतों. त्यांतूनच ही 'विराणी' पुढें आली आहे.

या कथासंग्रहांतल्याहि सर्व गोष्टी गोमंतकीयच आहेत. जें पाहिलें, ऐकले आणि अनुभवलें त्यालाच यथामति वाङ्मयरूप दिलें आहे.

शके १८७२<br>विजया दशमी<br>पुणें

—लेखक

# कथानुक्रम

# विराणी



शुक्रवारच्या कुणकुंबीच्या बाजाराला जाण्यासाठीं गुरवारीं संध्याकाळीं कांहीं मंडळी वाट चालत होती. प्रत्येकाच्या खांद्यावर एकेक रिकामें पोतें अन् त्यांत रात्रींच्या पोटपूजेसाठीं घेतलेल्या दशम्यांचें पुडकें होतें. सूर्यास्तापर्यंत ते सह्याद्रीच्या पायथ्याशीं पोंचून, रात्रीच्या शांत वेळीं चांदण्याच्या प्रकाशांत सावकाशपणें घाट चढणार होते, 'चांदसुऱ्या'च्या पठारावर फराळ आटपणार होते, माथ्यावरच्या पारवड गांवीं मारुतीच्या देवळांत डुलकी घेणार होते, सकाळीं उठून दहा वाजायच्या सुमाराला बाजारच्या गांवीं पोंचणार होते अन् मग कोणी गुळाची ढेप, कोणी गोड्या तेलाचा डबा तर कोणी इतर कांहीं सामानसुमान खरेदी करणार होते.

विष्णुकाका त्यांचा म्होरक्या. तिथल्या खरेदीच्या व्यवहारांतला तो 'मुरंबा' होता. बाकीचे सगळे नवजवान. अधिक आगळं ओझं घाट उतरून आणणारे. आतां एवढी पांच सहा कोसांची वाट चालावयाची तर करमणुकीचें कांहीं साधन हवेंच कीं. विडी-पान होतें; पण तें नित्याचेंच. तेव्हां सगळ्यांनीं विष्णुकाकाला आग्रह चालवला कीं 'आम्हांला एखादी गोष्ट सांग.' 'आठवतों, सांगतों' म्हणत तो हळूहळू पुढें चालला होता. 'अजून नाहीं का आठवली' म्हणून ते मधून मधून त्याला जागवीत होते.

अखेर तो एका ठिकाणीं वाट सोडून उजव्या हाताच्या रानांत घुसला. 'तुम्हांला गोष्ट हवी ना? मग या माझ्यामागनं.' त्यानें म्हटलें.

"काका, गोष्ट काय कुठें पुरून ठेवली आहे?" एकानं खवचटपणें विचारलें. विष्णुकाका आडवी आलेली एक डहाळी हातांतल्या कोयतीनं कच्‌दिशीं तोडून म्हणाला,

"तें कळेल आतां थोड्याच वेळांत. 'ताकाआधीं मीठ' कशाला खातोस?"

सुमारें मैलभर अंतर ते चालून गेले. पुढें जमिनीला उतार लागला. खालीं एक विस्तीर्ण खोरें दिसूं लागलें. त्याच्या एका अंगाला नदीचा प्रवाह संथपणें वहात असल्याचें निदर्शनास आलें. माणसाच्या सहवासासाठीं झुरणीला लागून कसेंबसें जीवन कंठणारे कांहीं माड दिसूं लागले. पाण्याविना सुकलेल्या अन् रानवेलींनीं आपादमस्तक घेरून जर्जर केलेल्या कांहीं, 'परित्यक्ता' पोफळीहि आढळल्या. एका काळीं तिथें मानव नांदत असल्याच्या त्या खुणा होत्या. पण तें मानवनिर्मित कलाकेंद्र उद्ध्वस्त करून कालपुरुष तिथें आतां वन्य वृक्षांना पोशीत होता.

त्या सगळ्या आसमंतावर नजर खेळवून विष्णुकाका बोलला,

" पोरांनो, तुम्ही आतां जिथून चालतां ती पायवाट एकाकाळीं चांगली मळत होती. आपल्या सारखेच कणकुंबीचे बाजारकरी घोटभर 'ताकाचं पाणी' घोटण्यासाठीं ही वाट धरायचे. गोण्या लादलेले वाण्यांचे बैल घणघण घंटानाद करीत दुपारच्या विसाव्यासाठीं याच वाटेनें खालीं उतरायचे. तान्ह्या गायी गोठ्यांतल्या वासरांना पाजण्यासाठीं भरल्या 'ओटी'नें याच वाटेवरून खालीं धावायच्या."

" ए विष्णुकाका, खालीं म्हणजे कुठें ? " एका तरुणानें पृच्छा केली.

" तेंच दाखवतों, या. आणखी दहावीस पावलं पुढें गेलं पाहिजे...... हीं समोरचीं पडकीं भिताडं पाहिलींत ? आतां इथें 'असकड' वाढलं आहे. कांटेरी झुडपं तरारलीं आहेत. पण कांहीं वर्षांपूर्वी हें घर नांदतं-वसतं होतं. आकाशाची उंची मोजायला निघालेल्या या समोरच्या फणसाला अन् त्या पलिकडच्या सातविणाला माणसाचा शब्द ऐकूं येत होता. माणसानं दीर्घस्वरानं घातलेल्या 'कुकाऱ्या'चा प्रतिसाद घुमवण्याची या टेकड्यांना संवय होती. या घराच्या कौंबळी छपरांतून गाळून वर निघालेला धूर झाडांपेडांच्या सांदीकोंदीत शिरत होता.

या घरांत माणसं फक्त दोन. एक पुरुष अन् एक स्त्री. त्या दोहोंचे तीन, चार होण्याची शक्यता नव्हती. कारण तीं दोघं नवरा—बायको नव्हतींच मुळीं ! तो तिचा धाकटा दीर होता अन् ती त्याची थोरली भावजय होती."

" विधवा असेल. " एक श्रोता मधेंच बोलला.

" विधवा नव्हे; पण सधवा असंहि खात्रीनं सांगतां आलं नसतं."

" म्हणजे अजबच आहे." दुसरा एक श्रोता उद्गारला.

"या संसारांत अजब कांहींच नाहीं. समज, एखाद्या तरुणाचं मनाविरुद्ध लग्न झालं आहे. सहवासानंसुद्धां त्याला बायकोची आवड उत्पन्न होत नाहीं. तिनं कितीहि जीव तोडून चांगलं केलं तरी त्याच्या कपाळावरची आठी मोडत नाहीं. ' सांकेरीं ' जमत जमत जातात. अप्रीति सारखी धुमसत रहाते. अखेर एक दिवस स्फोट होतो अन् तो डोक्यांत राख घालून परागंदा होतो. वर्षामागून वर्षं लोटतात. कोणीच त्याच्याबद्दल ' अस्ति नास्ति ' कांहीं सांगूं शकत नाहीं. अशा स्थितींत त्याच्या बायकोला तुम्ही काय म्हणाल ? विधवा कीं सधवा ? कारण तिचे ' भोग ' विधवेचे असतात. अन् आशा–आकांक्षा सधवेच्या असतात.

या बाईचीहि तीच तऱ्हा होती. वर्णानें गोरी, अंगानें चवळीची शेंग, अशिक्षित खरी; पण तरतरीत. परंतु दुर्दैवानें नको तें घेऊन जन्माला आलेली. नेमकं तिच्या उजव्या गालावर चार बोटं रुंदीचं काळं निळं ल्हासं होतं. एका गालावर उषा तर दुसऱ्या गालावर अवसेची रात्र. या वैगुण्यानेंच तिचा घात केला होता. या स्थितींत किती तरी उन्हाळे, पावसाळे उलटले होते. तिच्या यौवनाचा पूर ओसरला होता. नवरा परत येण्याची आशाहि क्षीण झाली होती. तरीहि ती कपाळीं घसघशीत आडवं कुंकू लावीत होती अन् मंगळसूत्राचा एखादा पदर ओघळला कीं पुनः तें नव्या वाकाच्या दोरांत गुंफून गळा सजवीत होती.

आतां तिचा ' निर्वाणीचा पांडुरंग ' तो धाकटा दीर झाला होता. त्याला तरी तिच्यावांचून कोण होतं ? कारण ' हक्काचं माणूस ' त्याच्या घरांत कधीं आलंच नाहीं. मुहूर्त सुरू झाले कीं भोंवतालच्या पंचक्रोशींत कितीतरी लग्नं होत. कित्येक ठिकाणचीं त्याला आमंत्रणंहि येत; पण तीं पंक्तिभोजनासाठीं ' इतरेजन ' म्हणून. नवरदेव या नात्यानें त्याला कोणीच कधीं आपल्या मांडवांत पाचारण केलं नाहीं. अन याचं मुख्य कारण म्हणजे त्याचं हें डोंगरखोऱ्यांतलं, शेजार नसलेलं एकुलतं घर. सीतेचा वनवास चौदा वर्षांनीं संपला. द्रौपदीला बारा वर्षांपेक्षां अधिक काळ वनवासांत

कंठावा लागला नाहीं. पण दाजीला मुलगी द्यायची म्हणजे तिच्या कपाळीं ' जन्मठेप काळं पाणी ' असंच प्रत्येक बापाला वाटे.

एवढा विजनवासाचा एक दोष वगळला तर इथें इतर सर्व समृद्धि होती. नदीकांठचा तो मळा नांगरून चार ' कुडव ' भात पेरलं कीं तें महामूर पिके. नदीला जिभा फुटून मोठा ' आऊर ' जरी शेताच्या डोक्यावरून गेला तरी नुकसानीच्या ऐवजीं फायदाच होई. ' एक हात दुधांत अन् एक हात दह्यांत ' इतकं दुभतं नेहमीं घरांत असे. प्रतिवर्षी दोन तीन गाई तरी गोठ्यांत व्यायच्या. दूध, गूळ अन् भरीला मोहाच्या नारळाचा ' आपरस ' घालून गुबगुबीत खर्वस बनवला कीं वहिनीला आपल्या नवऱ्याची आठवण व्हायची अन् तिच्या डोळ्यांतून दोन थेंब गळायचे.

मनुष्यबळाचा अभाव, त्यामुळें हें काम पुरुषी अन् हें काम बायकी अशी इथें वांटणी नव्हती. पदर बांधून अन् नेसण वर आंवळून वहिनी नांगर धरीत असलेली कित्येकदां मी पाहिली आहे. केळीवरच्या पिकायला आलेल्या घडावर काळ्या तोंडाचा हुप्या येऊन फराळाला बसला किंवा जिच्या लिंबांचं वर्षाचं लोणचं व्हायचं त्या लिंबिणीचीं पानंफुलं ओरबाडूं लागला कीं खुंटीवरची भरलेली बंदूक घेऊन वहिनी त्याला नेमका टिपायची. दाजी तिचा या विद्येतला गुरु होता. पाटाखालच्या त्या सातिवणाच्या खोडाला छिद्रंच छिद्रं पाडून अखेर ही नेमबाजी तिनं हस्तगत केली होती.

स्वयंपाक कसा चमचमीत करावा, दुभत्याचीं भांडीं निर्मळ कशीं राखावीं, भाजी चिरायची तीसुद्धां नाजूक नकसूत कशी चिरावी, हे धडे दाजीला तिनं सप्रयोग दिले होते. तिच्या हक्काच्या रजेंत सगळं यथास्थित करून दाजी दरमहा आपल्या विद्येची परीक्षा देत होता.

वर्षाचं भात येऊन तस्यांत पडलं अन् सुपारीचा हंगाम होऊन पेटी थोडीशी जड झाली कीं, दाजीच्या मागून तिची भुणभुण सुरू व्हायची. " तुम्ही आतां ' तिकडच्या ' शोधाला चला. चार देश हिंडून त्यांचा तपास काढा. " दाजी ती गोष्ट ' आईक–नाईक ' करी. मग एखादे दिवशीं ती त्याच्यावर चिडे. मग त्या रात्रीं जेवतांना दाजीला वहिनीच्या दुधांतल्या दशमीचा तुकडा मिळत नसे. कांद्याच्या कुवळाला काजू वाटून ' आळेण ' लावायचं राहूनच जाई. तशा धुसमुसत्या मनःस्थितींत घोंगडीचं

घुंगट घेऊन ती पडवीवर झोपली कीं उगवलेला चांदोबा दारांतल्या फणसा-वर चढून तिच्या आंगणांत रुप्याचा रस सांडून गेला तरी तिला त्याची दखल नसे. एक दिवस तिच्या रागाचा पारा अधिकच चढला, तेव्हां दाजी काकुळतीच्या स्वरांत तिला म्हणाला,

" कुठं जायला सांगतेस मला ? मी हा असा मुखदुर्बळ. मला देशा-वरची ' आस–भास ' कांहींसुद्धां कळायची नाहीं. वेंधळयासारखा कुठेंतरी जाईन अन् कोणी तरी सोदा, भामटा मला ' खंडेराव ' बनवील. त्यापेक्षां आपण गजाभाऊला पाठवूं या; तो आहे बरा ' चतुर साबाजी. '

गजाभाऊचं अधून मधून त्यांच्याकडे येणं जाणं असे. आपण दाजीचा कोणीतरी आतेमावसभाऊ लागतों असें तो पूर्वीच्या कांहीं पिढ्या मोजून सांगत होता. दाजी तें खरं मानून चालला होता. बैलांवरून भात, गवत, सुपारी, काजू वगैरे माल वाहून नेणं हा गजाभाऊचा धंदा होता. घरीं काम नसलं किंवा कंटाळा आला कीं चार गांवगप्पा पोतडींत टाकून तो या घरीं दाखल व्हायचा. इकडून तिकडून विषय काढून प्रथम त्यानें जिव्हास्त्र चाल-वायचं तें आपल्या घरच्या बायकांवर. त्याची मुख्य तक्रार असायची ती त्यांच्या अंगीं सुग्रणपणा नसल्याबद्दल. त्यांच्या स्वैंपाकाच्या एकेक तऱ्हा अन् त्यामुळें होणारे आपले हाल यांचं रसाळ वर्णन करून शेवटीं त्यानें समारोप करायचा तो या ठराविक वाक्यानें. ' एकूण काय, म्हशींनीं करायचं अन् रेड्यांनीं खायचं ! '

हें त्याचं अवढाणं घालवण्यासाटीं निदान सांवरबोंड्या केळ्यांचे काप अन् ओल्या लसणीची कढी हे दोन पदार्थ करण्यावांचून मग वहिनीला गत्यंतर नसायचं. अशाच एका आगमनप्रसंगीं दाजीनें जेव्हां प्रवासाची गोष्ट काढली तेव्हा कपाळाला सुरकुत्या घालून तो म्हणाला,

" खरं म्हणजे, मला प्रवासाचा कंटाळा आहे. पण प्रश्न पडला वहिनी-च्या सौभाग्याचा; तेव्हां जाणं भाग—! "

दाजीनें सुरती शंभर रुपयांचे दोन ' स्तंभ ' त्याच्यापुढें उभे केले. गजाभाऊचे डोळे लकाकले. वेळ न लावतां त्यानें ते उपरण्याच्या पदरांत बांधले. क्षणभरहि मग तो तिथें थांबला नाहीं. न जाणों; दाजीचा बेत बदलला तर—!

गजाभाऊ जातांना जीं प्रतिज्ञोत्तरं बोलला होता त्यावरून वहिनीची आशा चांगलीच पालवली होती. तिच्या ' नव्हाळी 'च्या काळांत पतीची जवळीक करण्याचा जो एक क्षण तिनें आपण होऊन साधला होता, त्या वेळचा तिचा अनुभव कटुतीव्र होता. ती ' खंडिता ' होऊन परतली होती. पण एवढ्या प्रदीर्घ विरहानंतर तो आपला द्वेष करणार नाहीं, तो परत येईल तो सर्वस्वी नवा होऊन येईल, नवं प्रेम, नवं दाक्षिण्य घेऊन घेईल, अशा कल्पनांवर तिचं मन तरंगू लागलं होतं. व्यंकटेशस्तोत्राचा नित्यपाठ करतांना ती देवाला प्रार्थीत होती कीं, करुणाघना ! माझा ' राम ' मला भेटव. मी सीता बनून माझ्या बाहूची त्याला उशी करीन; त्याच्या सेवेंत चंदनाच्या बाहुलीसारखीं अष्टांगें झिजवीन—'

एका महिन्यानंतर गजाभाऊ परत आला. अंगांणत पाऊल ठेवतांना निराशा अन् कष्ट यांचं घोटीव मिश्रण त्यानें आपल्या तोंडाला सारवलं होतं. पडवीवर येतांच पाठीवरचं गांठोडं धप्पदिशीं आदळून तो चौफाळयावर बसला. त्याची खालमुंडी पाहून ' काय झालं, ' हें विचारायचा धीरच झाला नाहीं कोणाला.

त्यानंतर आपण कोणकोणतीं शहरं पाहिलीं, कोणकोणतीं तीर्थक्षेत्रं धुंडलीं हें सांगतांना काशी, रामेश्वर, पंढरपूर, खानापुरम्, यल्लापुरम्, पाच्छापुरम् अशी फार मोठी नामावळ त्यानं वाचली. प्रत्येक देवाचा प्रसाद आणायलाहि तो विसरला नाहीं. खारका, डाळं, लाह्या, पिंजरबुक्का, भस्म, अशा अनेक पुड्या त्यानं वहिनीच्या पुढें सोडल्या.

" चुलींत घाल तो तुझा प्रसाद ! " वहिनी कावून मनांतल्या मनांत म्हणाली. आणि मग दाजीकडे तोंड वळवून तो सांगूं लागला,

" तूं दिलेले शंभर रुपये कातालासुद्धां पुरले नाहींत. पण पत्करलेलं काम अर्धवट सोडायचं नाहीं हा माझा स्वभाव पडला. तेव्हां पदरचे शंभर रुपये खर्चून मी सगळे देश पालथे घातले. पण जिथें जावं तिथं निराशा ! मला वाटतं तो जिवंत न—"

" खबरदार गजाभाऊ असली अभद्र वाणी उच्चाराल तर ! " वहिनी कडाडली. त्यासरशी त्याची दांतखीळ बसली. आज आपला पाहुणचार काय स्वरूपाचा होईल याची यथातथ्य कल्पना आल्यामुळें गजाभाऊ भर

मध्यान्हीं तिथून सटकला. जातांना दाजीनं जर त्याचं गांठोडं सोडून पाहिलं असतं तर एक जरीचं लुगडं, एक काश्मिरी शाल अन् मुलाचं नांव घातलेलं चांदीचं एक भांडं, या वस्तूंनीं गजाभाऊच्या प्रवासाचं खरंखुरं इतिवृत्त सांगितलं असतं.

त्यानंतर वहिनीनें नवऱ्याचा शोध करण्याबद्दल कधीं गोष्ट काढली नाहीं; पण तिचा अंतर्यामी तिला ग्वाही देत होता कीं 'तो जिवंत आहे. पृथ्वीच्या पाठीवर कुठें तरी सुखरूप आहे!'

एवढें बोलून विष्णुकाका थोडा वेळ स्तब्ध राहिला. श्रोत्यांना वाटलें कीं गोष्ट संपली.

"हात्तेच्या! ही कसली गोष्ट! अगदींच मिळमिळीत!" एकजण कुरकुरला.

"जरा दमानं घे बेट्या! मी स्तब्ध झालों तो गोष्ट संपली म्हणून नव्हे; तर ती एका विशिष्ट टप्प्यावर आली म्हणून. खरा गजाभाऊ तुम्हाला यापुढें दिसायचा आहे. तो हुबेहूब तुमच्या डोळ्यांपुढें उभा करायचा तर मला तशीं 'अक्षरं' मिळवलीं पाहिजेत. आतां पुढचाच प्रसंग ऐका—

वहिनीनें गजाभाऊला निरोप पाठवून बोलावून आणलं तें कशाकरतां तर दाजीला औषधपाणी करायला. 'वाळपईला जाऊन डॉक्टरचं औषध घेऊन या' म्हणाली तर हा सांगतो, 'करायचा आहे काय डॉक्टर! मी स्वतः डॉक्टरचा बाप लागून राहिलों आहे. असले किती तरी ताप मी उतरले आहेत. सांगतों तसं कर तूं. बेलाचा पाला आण, तो उखळांत कूट, काहिलींत घालून जरा कढत कर अन् शेकता शेकता टाळूवर बांध त्याच्या. दोन तासांत घाम येऊन ताप उतरेल.'

"तुमचे अनुभव या वेळीं तरी मला नको आहेत. तुम्हांला जाववत नसलं तर तुम्ही यांच्याजवळ रहा. मी सकाळीं निघून रात्रीं अंधार पडेपर्यंत औषध घेऊन परत येईन."

एवढं ती निक्षून बोलली तेव्हां कुठें स्वारी शिसा घेऊन वाळपईच्या मार्गाला लागली. दाजीची परिस्थिति होतीच तशी गंभीर—

आठ दिवसांपूर्वी तो आंबेज्याच्या काल्याला गेला होता. रातभर जागून त्यानें मोचेमाडकरांचा दशावतारी खेळ पाहिला होता. घरीं येऊन जाग्रण निवळावं म्हणून तो झोंपला तिथेंच त्याला ताप भरला होता. थंडी पडशाचा असेल म्हणून वहिनीला ठाऊक होते तेवढे काढे करून तिनें आलटून पालटून त्याला पाजले होते. पण चार दिवस झाले तरी त्याचं अंग निवलं नव्हतं. नंतर तो बरगडीला हात लावून ' इथं दुखतं ' म्हणून सांगूं लागला होता. वहिनीनें धूप वाटून त्याच्या छातीला गरम लेप दिला त्याचाहि कांहीं उपयोग झाला नव्हता. तो विषमज्वर आहे अन् त्याच्या भरीला न्यूमोनियाहि झाला आहे, हें त्या रानांत जन्म काढलेल्या त्या बाईला समजण्यासारखं नव्हतं. दाजी एवढा तगडा गडी; पण आठ दिवसांत चोपून गेला होता. विषमज्वरांत रोग्याला अन्न देणं घातक असतं हें तरी तिला कसं कळावं ! ताप सोसायला तरी ताकद पाहिजे अन् ती अन्नावांचून कशी रहाणार, या भावनेनं ती दिवसांतून दोन वेळां दाजीला अळेंबळें दहींभात भरवीत होती. आणि या सगळ्या विरुद्ध उपचारांनीं त्याचं दुखणं भलत्याच थराला गेलं होतं.

गजाभाऊ संध्याकाळीं औषध घेऊन आला. देवाचं नांव घेऊन वहिनीनं तें त्याच्या तोंडांत ओतलं. त्यानंतर अंधारी रात्र आली. दाजीच्या तापाची नववी रात्र होती ती. गजाभाऊ चार कोसांची वाटचाल करून आलेला म्हणून त्याला झोंपण्याचा हक्क होता. रोग्याच्या उशाशीं व्यंकटेशस्तोत्र जपीत जागत बसली होती ती वहिनी. त्याची ती अशरण अवस्था पाहून वहिनीला भडभडून येत होतं. ती मनांत म्हणत होती, ' हे घरांत असते तर भाऊजींना औषध-उपचार वेळेवर झाले असते. मीं पडलें बाईमाणूस ! माझं गाऱ्हाणं आतां देवानंच ऐकायचं. '

गजाभाऊ पडवींतल्या चौफाळ्यावर घोरत होता. पण त्याच्या नशिबीं आज पुरती झोंप नव्हती. तिसरा प्रहर संपायच्या सुमाराला वहिनीनें भयकंपित आवाजांत त्याला हांक मारली. तो उठून आंत गेला. कांहीं क्षण त्या जात्या जिवाकडे त्यानें टक लावून पाहिलं. वहिनी पदरानं तोंड झांकून स्फुंदत होती. तिला तो म्हणाला, ' ऊठ आतां तिथून. पडवीवर येऊन बैस ! '

कोसावरून चार मंडळी बोलावून आणून पुढचं सगळं उरकेपर्यंत दुपार टळून गेली. लगेच गजाभाऊनं कुडतं चढवून मुंडासं बांधलं. भिंतीच्या मुळाशीं पडून राहिलेल्या वहिनीला तो म्हणाला,

" मी जातों आतां घरीं. कोणी मेलं गेलं म्हणून ज्याला त्याला आपला संसार टाकतां येत नाहीं. "

वहिनी त्याच्याकडे पहातच राहिली. हा प्राणी माणूसच आहे का, याची तिला शंका आली असावी. वस्तुतः आज त्यानें तिथून हालणं उचित नव्हतं. तिला त्या अरण्यनिवासांत एकटं रहाण्याची संवय होती. तितकी ती धीटहि होती. पण आजचा प्रसंग वेगळा होता. आणि गजाभाऊला जायचंच होतं तर त्यापूर्वीं अच्छेराचा ' चरु ' शिजवून तिच्यापुढं आदळणं एवढं तरी त्याचं कर्तव्य होतं. पण — "

" अरे हरामा गजाभाऊ— " विष्णुकाकाचा दुसरा एक श्रोता दांत-ओंठ खाऊन उद्गारला. खरोखर या वेळीं गजाभाऊ त्याच्यासमोर असता तर त्यानं हातांतलें दांडकें बेधडक त्याच्या टाळक्यांत घातलें असतें. त्याचा तो आवेश पाहून विष्णुकाका बोलला,

" जरा सबूर ! अजून त्याचे शंभर अपराध भरायचे आहेत. पुढचं ऐक आतां. त्यानें तोंड काळं केलं अन् वहिनी स्मशानशांति पसरलेल्या त्या घरांत एकटी पडली. भुकेनें आंतडीं तुटत होतीं; पण स्वतःच्या हातांनीं करून खाणं हें त्या दिवशीं तरी अनुचित होतं. एक भला मोठा ओंडका लावून तिनें पडवींतला परसा सांदुकला अन् तिथंच धरणीचा आश्रय घेतला. त्या अग्निनारायणानंच तिला त्या भयाण रात्रीं सोबत केली.

त्या दिवशीं ती जें रडली तें खरोखरीच ' अरण्यरुदन ' होतं. तें घर आतां ' घर ' उरलं नव्हतं. कोणाच्या आधारावर ती आतां तिथं रहाणार होती ! तिच्या डोळ्यापुढं पतीची मूर्ति उभी राहिली. ' कुठें आहेस तूं ! कां माझा असा अंत पहातोस ? ' म्हणून तिनें त्या कल्पनागम्य मूर्तीपुढें टाहो फोडला. काय वाटेल तें होवो; पण आतां जीवनाच्या अंतापर्यंत त्याचा शोध करीत रहायचं हा तिनं मनाशीं निर्धार केला. आणि त्यानंतर तिला थोडीशी डुलकी लागली.

सकाळीं झुंजुमुंजु व्हायच्या वेळेला ती उठली अन् दाराला कडी लावून नदीवर गेली. तिची पाठ फिरते न फिरते तोंच गजाभाऊ वाहणीचे सात आठ बैल अन् आपला पंधरा सोळा वर्षांचा पोरगा यांच्यासह तिथं दाखल झाला. वहिनी घरांत नाहीं हें त्याच्या पथ्यावरच पडलं. बापलेक कडी काढून घरांत घुसले. भराभरा तट्ट्यांतलं भात उपसून त्यांनीं गोण्या भरायला सुरुवात केली. त्याची ती घाईगर्दी पाहून कोणालाहि असं वाटलं असतं कीं त्या घराला आग लागली आहे अन् हे दोघे महापुरुष जिवावर उदार होऊन त्यांतली चीजवस्त बाहेर काढीत आहेत.

गजाभाऊ काल जो घाईघाईनें निघून गेला होता तो याच पुण्यकर्माच्या पूर्वतयारीसाठीं. वहिनी आतां इथं रहाणं शक्य नाहीं हें त्यानं केव्हांच हेरलं होतं. तेव्हां तिनं घरांतल्या दाण्यागोट्याची वासलात लावण्यापूर्वीं आपणच सगळं घर स्वच्छ करावं हा स्वार्थ धरून तो ही नागवण करायला आला होता.

वहिनी नदीवरून परत येते तों हें विपरीत दृश्य ! तिला या प्रकाराचा अर्थच कळेना. हा राजरोस दरोडा तर होताच, शिवाय दुःखावर डागणीहि होती. संतापानें बेभान होऊन ती पुढें आली.

“ गजाभाऊ ! काय मांडलं आहेस तूं हें ! भाऊजी गेले तरी मी जिवंत आहें अजून इथं. आमच्या कष्टांचं हें अन्न लुबाडून न्यायला लाज वाटत नाहीं तुला ? ”

“ लाज कसली त्यांत ? दाजी मेला त्याच वेळीं या घरादाराचा मी वारस ठरलों. ” पाटींतलं भात गोणीच्या तोंडांत ओततां ओततां गजाभाऊ गरजला.

“ कुठल्या कायद्यानं तुला ही वारसदारी मिळाली ? ”

“ हा प्रश्न मला तूं कोर्टांत विचार. तिथें देईन याचं उत्तर— ”

“ मग तुझी वारसदारीहि तूं कोर्टांतच सिद्ध कर. तोंवर तुला मी एक दाणाहि इथून हालवूं देणार नाहीं. ”

“ हुंः ! आडव्या सुडक्याची बाई तूं ! काय करणार आहेस माझं ? रडशील; भेकशील, फार तर जीव देण्याचं भय दाखवशील— ”

गजाभाऊ दुसरी पाटी भरून आणण्यासाठीं घरांत जाऊं लागला. वहिनीनें चटकन् पुढें होऊन दार अडवलं. एक क्षणच तो थबकला. दुसऱ्या क्षणीं त्यानें वहिनीचा हात हिसकला. दुःख, कष्ट, उपवास, यांनीं गलितगात्र झालेल्या वहिनीला दूर लोटून द्यायला त्याला फारसे श्रम पडले नाहींत. माणसुकीची ग्यान मुरगळूनच या वेळीं तो इथें आला होता.

त्यानं सगळ्या गोण्या भरल्या. बाप-लेकांनीं मिळून त्या बैलांच्या पाठीवर लादल्या. वहिनी हें सगळं उघड्या डोळ्यांनीं पहात होती. तिला पहावं लागत होतं. जीव जळत होता; पण अंगांत त्राण नव्हतं.

परत जाण्याची एवढी सगळी तयारी झाल्यावर गजाभाऊ मुख्य 'ऐवज' उचलण्यासाठीं पुनश्च घरांत रिघला. त्यानं तो आधींच हेरून तट्टयाच्या आडोशाला आणून ठेवला होता. दाजीनं इतक्या वर्षांच्या कष्टानें जमवलेली 'माया' त्या पेटींत होती. ती उचलून घेऊन जेव्हां तो बाहेर आला तेव्हां मात्र वहिनीच्या काळजांत भाला बसला. तिचे सगळे मनोरथ त्या पेटीवर उभारलेले होते. त्या द्रव्यबळावरच ती पुरं पट्टणं हिंडून पतीचा शोध करणार होती. पण तो उलट्या काळजाचा संवचोर जेव्हां तिचं तें सर्वस्वच लुबाडूं लागला, तेव्हां ती काकुळतीला आली.

"गजाभाऊ, बाकी सगळं तुमच्या अर्पण होऊं दे. पण तेवढी पेटी माझी मला ठेवा. पाया पडतें तुमच्या !"

"वहिनी, पेटी तुझ्याकडे असली काय, माझ्याकडे असली काय, सारखंच. माझ्या घरींच ती इथल्यापेक्षां सुरक्षित राहील, समजलं ?" अशी मानभावी समजावणी करून त्यानं ती पेटी पोत्यांत घातली आणि तें पोतं खांद्यावर टाकलं. आणि लगेच तो पोराला म्हणाला, 'चल, हांकल बैल !'

आहे का कोणी आपल्या धावण्या धावणारा, म्हणून वहिनीनं एकवार आसपास पाहिलं. जिकडे तिकडे वृक्षपाषाण उभे होते; पण ते सगळे स्थावर. पक्षी किलबिलत होते; पण त्यांना मानवी व्यवहार अगम्य. त्यामुळें वहिनीचं हृदय आक्रंदुन उठलं. सहज म्हणून तिची माजघरांत दृष्टि वळली आणि तिला परब्रह्म भेटल्यासारखं झालं. धांवत जाऊन दोन खुंट्यांवर आडवी ठेवलेली ती सुसज्ज बंदूक तिनं हस्तगत केली. तीच आतां तिची प्राणसखी होती. दुसऱ्याच क्षणाला ती पडवीच्या टोंकावर येऊन उभी राहिली.

" थांब ! चाललास कुठें ? ठेव ती पेटी खालीं." ती कडाडली. बाप-लेकांनीं दचकून मागं पाहिलं. वहिनी डावा पाय पुढें टाकून पवित्र्यांत उभी होती. बंदुकीचा दस्ता तिनें आपल्या उजव्या छातीच्यावर टेकला होता. नळी गजाभाऊवर रोखली होती. डावा हात नळीच्या मध्यावर अन् उजव्या हाताची तर्जनी ' घोड्या 'च्या चापावर होती. तिच्या डोळ्यांतून अंगार सांडत होते. मुद्रा भेसूर झाली होती. गालावरचं तें निळं ' ल्हासं ' अधिकच गहिरं झालं होतं.

त्या पोरानं एक दबता चीत्कार करून पलीकडच्या झुडपांत उडी घातली अन् तो धूम पळत सुटला. त्याच बापाची अवलाद होती ती ! पण गजाभाऊ मात्र खिळल्यासारखा झाला. प्राणांशीं खेळ खेळायला तयार झालेल्या त्या संहारभैरवीच्या अवताराकडे पहातांच त्याचं रक्त गोठलं. डोळ्यांच्या कवड्या झाल्या.

वहिनीला कळलं कीं आपली मात्रा लागू पडली आहे. गजाभाऊ पुढेंहि येऊं शकत नाहीं अन् मागेंहि जाऊं शकत नाहीं. ती मग आत्मविश्वासानं म्हणाली.

" पेटी ठेवतोस का फोडूं डोक्याचा नारळ ? हा ओढला बघ चाप—"

" नको माझ्या आई, मी चुकलों. शेण खाल्लं." लुळ्या पांगळ्या हातांनीं त्यानं ती पेटी काढून अंगणाच्या मेरेवर ठेवली. पण एवढं करूनहि त्याला तोंड वळवण्याचा धीर होत नव्हता. न जाणो; पळतां पळतां पाठींत गोळी घुसली तर—

वहिनीचं काम झालं होतं. यापुढं अधिक वेळ तीं त्याचं काळं तोंड पहायला तयार नव्हती.

" जीव हवा असला तर जा, पळ आतां ! "

" पाठीमागून गोळी झाडणार नाहींस ना ? " त्यानं गयावया केलं.

" पुनश्च या बाजूला फिरकणार नसलास तर. " वहिनी म्हणाली.

" नाहीं. कधींच नाहीं. आजची आठवण जन्मभर पुरेल मला."

गजाभाऊच्या शब्दांत जीव नव्हता; पण आता पायांत मात्र आला. तो मानवजातीचा कलंक, सगळं टाकून पळत सुटला. बैल राहिले, गोण्या राहिल्या,

पोरगं कुठें उलथलं त्याचाहि पत्ता नव्हता. पण यावेळीं आपल्या प्राणांपेक्षा इतर कशाचीच त्याला कदर नव्हती.

वहिनी कृतकृत्य होऊन आंगणांत उतरली. बंदूक टाकून तिनं पेटीवर आधीं झेप घातली. तें सर्वस्व तिनं उराशीं कवटाळलं. आणि याच वेळीं तिचं उसनं आणलेलं बळ खलास झालं. मरण–मारणाचा आवेश ओसरला. हातपाय गळून पडल्यासारखे झाले. एकाएकीं डोळ्यांपुढें काळोख आला आणि—

मूर्च्छा येऊन ती त्या पेटीसह धरणीवर कोसळली!

त्याच वेळीं कणकुंबीच्या बाजाराहून आम्ही चौघे पांच जण तिथं उतरलों. सकाळची शांत वेळ होती तरी वाटचाल अन् पाठीवर गुळाच्या ढेपांचं ओझं, यामुळं आम्ही घामाघूम झालों होतों आणि नुकत्याच घुसळलेल्या डेऱ्यांतल्या फेसाळ ताकाची अपेक्षा करीत होतों. पण तिथें आमच्यापुढें ताट वाढून ठेवलेलं होतं तें हें!

आम्ही सगळे वहिनीच्या भोंवतीं बसलों. एकानं पाटाचं तांब्याभर पाणी आणून तिच्या डोक्यावर बारीक धार धरली. एकानं आपल्या पोत्यांतला ‘घाटवळ’ कांदा मुठीनं फोडून तिच्या नाकाला लावला. तो उग्र दर्प श्वासावाटे आंत भिनला तेव्हां तिनं ‘ऊंऽ’ करून मान झटकली. आणि त्यानंतर अर्धवट गुंगींतले तिचे शब्द आमच्या कानावर पडले ते हे—

“...मी येणार आहें...तुम्ही असाल तिथं...घ्याल ना मला पदरांत?”



# वृंदा



कालच्या रात्रीं हस्ताच्या पावसाची अचानक सर पडून गेली होती. कुळागरांतल्या केळींचे हात मोडून अन् पोफळींचे शेंडे पिळवटून वाऱ्यानंहि 'कुंजरक्रीडा' केली होती. त्यामुळं आज सकाळीं बागेंत पोफळांचा नुसता सडा पडला होता. वृंदा जेमतेम पन्नास पोफळींच्या खाली वांकली असेल नसेल, तोंच तिची पाटी सपाट भरली होती. ती उचलून डोक्यावर घ्यायची तर कुणाचातरी हातभार हवा होता; पण आजूबाजूच्या कुळगरांत अजून कुणीच फिरकलं नव्हतं.

शेवटीं स्वतःच्या ताकदीवर भिस्त ठेऊन ती पुढं झाली. प्रथम तिनं ओणवून दोन्ही हात पाटीच्या बुडाशीं घातले. दांतीं बळ आणून पाटी थोडीशी वर उचलली. नंतर गुडघ्याचा आधार देऊन ती छातीपर्यंत आणली. आणखी थोडासा जोर केला कीं ती हनुवटीपर्यंत येईल अन् मग मान वाकवून तळीं दिली कीं ती अलगद डोक्यावर बसेल अशी तिची समजूत असावी. पण ऐन वेळीं हातांनीं अवसानघात केला अन् ती बाजूला लवंडली. तीं तांबडीं हिरवीं पोफळं जमिनीवर विखुरलीं. केलेले श्रम पाण्यांत गेले !

ती जिथं उभी होती तिथून अवघ्या पंधरावीस हातांवर एक वहाळ होता; त्याला लागूनच पलिकडे माझं कुळागर होतं. तिथून मला हा सगळा प्रकार दिसला. तो वाया गेलेला बलाविष्कार पाहून दुसऱ्या एखाद्या वेळीं मी पोट धरून हसलों असतों. पण आज माझं हसूं उगवण्याच्या पूर्वींच मावळलं.

वृंदेनं आपली अवघडलेली मान एकवार दाबली अन् जवळच्या पोफळीला घट्ट मिठी मारली. तिच्या अनावर हुंदक्यांनीं तिच्यासारखीच 'भरांत' असलेली ती पोफळ गदगदा हालली. चुडतांच्या पात्यांतून सांचून

राहिलेल्या पावसाच्या पाण्याचे ' ओथवत्रे ' वृंदेच्या केसांवर अन् चोळीचा कंगोरा पडलेल्या तिच्या उघड्या पाठीवर सडसडले. त्यामुळे तिची काया आपादमस्तक शहारली.

खरं म्हणजे तिनं इतकं असहाय्य व्हावं इतकी कांही ती घटना गंभीर नव्हती. त्यावरून मीं तर्क केला, कीं पाटी लवंडणं हें केवळ निमित्त कारण असून त्याच्यामागं निराळीच कांहीं व्यथा असावी. आतां मला पुढं होणं भाग होतं. घडेवरच्या अननशींच्या रानांतून मीं ओढ्यांत उडी मारली अन् दुसऱ्या बाजूनं वर चढलों. काकदृष्टीनं आजूबाजूला कुणी नाहीं अशी खात्री करून घेतल्यावर मी तिच्या पाठीशीं जाऊन उभा राहिलों.

माझी चाहूल लागतांच वृंदेनं पोफळीला बंधमुक्त केलं. पोफळीच्या खरखरीत अंगाला टेकलेला तिचा उजवा गाल अरुणप्रभा घेऊन उठला होता. तिनं आपले डोळे पुसून घेतले तरी त्यांत रडवी झाक उरलीच होती. तिच्या मनांतला विषाद थट्टेची फुंकर घालून उडवून लावावा म्हणून मीं म्हटलं, " तूं कवटाळलेल्या पोफळीची मला करुणा येते. "

" तिची येते; माझी नाहीं ना ? जा मग तिला कुरवाळ अन् कर सांत्वन तिचं."

" तें जाऊं दे; पण आज कांहीं विशेष घडलं कां वृंदा ? "

" कशाला त्याच त्याच कर्मकथा तुला ऐकवूं ? अन् काय उपयोग आहे त्याचा ? आंधळ्यापुढं नाचणं अन् बहिऱ्यापुढं गाणं निरर्थक आहे. सुखांत वाढलेला प्राणी अन् जातीचा पुरुष आहेस तूं. आमच्यासारख्या जळत्या जीवांचीं दुःखं तुला नाहीं कळायचीं. एवढी पाटी उचल माझ्या डोक्यावर. मला घरीं जाऊं दे. "

एवढ्या वेळांत तिनं तीं पोफळं फिरून गोळा केलीं होतीं. मी ती पाटी उचलून तिच्या डोक्यावर ठेवली. चुंबळ नसलेल्या मस्तकावर तें ओझं बसतांच तिच्या केसांचीं मुळं दुखावलीं. दंतपंक्ति आंवळून अन् डोळे मिटून तिनं एक सीत्कार केला. मागच्या बाजूनं गुडघ्याच्याहि वर उघडे दिसणारे तिचे नितळ घाटदार पाय, हळूहळू एकेक ओटा चढूं लागले.

वृंदेचं घर माणसांनीं गजबजलेलं होतं. दीर, जावा, नणंदा अशीं तिच्या अनेक नात्यांचीं माणसं तिथं होतीं. नव्हता तो एकच—ज्यानं तिला माळ

घालून आणली तो. वयाच्या चौदाव्या वर्षीच तिचं लग्न झालं होतं अन् डाव सुरू होण्यापूर्वीच संसाराचा ‘ सारीपाट ’ उधळला होता. चार भावांतला एक भाऊ कमी झाला म्हणून त्या घरांत विशेष कांहीं उणेपणा आला नव्हता. नगाला नग वृंदा होतीच त्याच्या जागीं. दोन वेळ गोळाभर अन्न घालून दिवसभर कामाच्या गाड्याला जुंपावी. ना गर्भारपण, ना बाळंतपण. जणू दुसरा पुरुषच. शिवाय दोन्ही खात्यांत उपयुक्त. हवा असेल तेव्हां शेतांत पाठवावा अन् नको असेल तेव्हां ‘ चुलींत ढकलावा.’ त्यामुळं वृंदा त्यांना फायद्याची गोष्ट झाली होती. तिला चार दिवस माहेरीं आणायची तर बापाला तिथं येऊन धरणं धरावं लागे.

आमच्या गांवांत तें घराणं म्हणजे एक और प्रकार होता. त्या माणसांना देवानं कोणत्या द्रव्यानं घडवलं होतं तें तोच जाणे! पुरुष नुसते आडदांड राक्षस. गांवाची नि गांवकीची त्यांना पर्वा नव्हती. ते सगळे ‘ धंदे ’ करीत. त्यांच्या शब्दावर विश्वास ठेवण्याची सोय नव्हती. नीति त्यांनीं आढ्याला बांधून ठेवली होती. अन् माणुसकी शेणाच्या गायरींत बुडवली होती. आपलीहि तीच गत होईल या भीतीनं संस्कृति तर त्यांच्या घरांत कधीं शिरलीच नव्हती. त्यांच्या बायकाहि त्यांना शोभण्याजोग्याच होत्या.

त्या घरांत सगळाच सांवळागोंधळ चाले. मर्यादा कुणालाच ठाऊक नव्हत्या. पुरुष विड्या ओढीत बसले कीं बायकाहि आपलं लाकडी पाळं घेऊन तिथंच येत अन् पानाचा तोबरा भरून ‘ चपाचपा ’ करीत. रात्रीच्या वेळीं पडवींतल्या परशाभोंवतीं सगळीं मंडळी शेकायला बसली कीं घरांत गडी म्हणून ठेवलेले कुळवाडी अन् गुरांचा राखणा हेहि त्यांतच येऊन घुसत. आणि मग पुरुषांचं अरबटचरबट बोलणं अन् बायकांचं फिदीफिदी हसणं याला कांहीं सुमार राहात नसे.

त्यांत सामील नसायची ती एकटी वृंदा. विनय आणि शिष्टाचार यांची ‘ दुराही ’ तिला मोडवत नव्हती. शिवाय तिच्या या अलिप्तपणामागं दुसरंहि एक दुर्धर कारण होतं. अर्धवट बायको गळ्यांत पडल्यामुळं एक असंतुष्ट ‘ देवचार ’ त्या घरांत वावरत होता अन् तो म्हणजे वृंदेचा धाकटा दीर. तो येनकेन प्रकारेण वृंदेची जवळीक करूं पाही अन् ती त्याच्यापासून नेहमींच चार पावलं दूर राही. तो एक तिच्या वांट्याला उद्योगच झाला

होता. वृंदा ज्या घरांत राहात होती तें घर हें अशा प्रकारचं होतं. तिच्या मनाला बोचणारी गोष्ट घडली नाहीं असा दिवसच जात नसे त्या घरांत.

अधूनमधून माझी भेट झाली कीं तिच्या त्या सांचलेल्या दुःखदैन्यांना वाचा फुटे. वस्तुतः आम्ही एका गांवचीं असलों तरीं आमचीं घरं बरींच दूर होतीं. ती वहाळाच्या 'पलतडी'ची, तर मी 'अलतडी'चा. पण आमचीं कळागरं दोन्ही बाजूंनीं मधल्या वहाळाला येऊन भिडलीं होतीं. त्यामुळं आमच्या अनेक वेळां गांठीभेटी होत. वहाळाच्या या धडेवर मी बसायचा, त्या धडेवर पोफळीला टेकून तिनं उभं राहायचं अन् मग शब्दांची, स्मितांची आणि कटाक्षांची देवघेव सुरू व्हायची. आजूबाजूला कुणाची चाहूल लागली कीं वृंदेनं जवळच्याच एखाद्या केळीच्या सोपावर हातांतल्या दांत्री कोयतीचा घाव घालायचा अन् तिच्याशींच एकमुखी 'नाट्यछटा' सुरू करायची. आणि एवढी धोक्याची सूचना मिळाली कीं अस्मादिकांना लांबलांब पात्यांखालीं झांकून ठेवायला तीं कांटेरी अननशीचीं झाडं तयार असायचींच.

अशा अनेक संभाषणप्रसंगीं मलूल होऊन आसवं गाळीत कुळागरांत आलेल्या वृंदेला मीं कितीदातरी हंसती करून घरीं पाठवलं होतं. अशा वेळीं माझ्या शब्दांत एवढी 'अमृतसंजीवनी' कुठून येते याचंच मला आश्चर्य वाटे. एक दुर्दैवी तरुण मुलगी सगळ्या गांवांत फक्त माझ्याशींच आपलं मन मोकळं करते, विश्वासानं आपल्या हृदयाचे घाव उलगडून दाखवते, ही अभिमान बाळगण्यासारखी गोष्ट नव्हती काय? रावण अन् कुंभकर्ण यांनीं घेरलेल्या तिच्या जीवनांत आपण थोडा तरी 'राम' ओतूं शकतों ही जाणीव आंतून मला गुदगुल्या करीत होती. एखाद्या वेळीं रोषाचा आव आणून मान वेळावीत अन् डोळ्यांतल्या बाहुल्या तीक्ष्ण करीत ती मला म्हणायची, "कशाला उगाच शब्दांचे बुडबुडे सोडतोस! फेस पिऊन कोणाची तहान शमत नाहीं, समजलं?"

तिनं असं कांहीं म्हटलं कीं उन्मादानं का भीतीनं कोण जाणे; पण माझं काळीज धडधडूं लागे.

आम्हांला ठाऊक नव्हतं तरी आमच्या वाढत्या स्नेहभावावर गांवांतल्या कांहीं साळकायांची वक्रदृष्टि पडली होती. शेतांत, कुळागरांत अन् पाटावर धुणंपाणी करतांना कुजबुजी सुरू झाल्या होत्या. त्यांतल्या कांहीं आईच्या कानापर्यंतहि पोचल्या आहेत असं तिच्या संशयी नजरेवरून मी ताडलं. एका तरुण विधवेशीं सलगी करणं, तिला दिलासा देणं हें जनरहाटीच्या दृष्टीनं 'अब्रह्मण्यम्' होतं अन् अनेक सामाजिक आपत्तींचं उगमस्थान होतं. त्यामुळं मला या बाबतींत सावधगिरी घेणं भाग झालं. मीं मनाशीं निर्धार केला, कीं यापुढं वृंदेशीं बोलणंचालणं बंद करायचं. तिचं दर्शन कटाक्षानं टाळायचं ! जर जगानं आरोपीच्या पिंजऱ्यांत उभं करून विचारलं असतं कीं, 'तुझं अन् वृंदेचं नातं काय ?' तर माझ्याकडे काय उत्तर होतं ?

पण दैवानं तोहि चमत्कार करून दाखवायचं ठरवलं, कीं तिचं-माझं नातं निर्माण व्हावं. एक दिवस चैत्रांतल्या ऐन दुपारीं वृंदेचे वडील आपल्या एका स्नेह्यासह आमच्या घरीं दाखल झाले. त्यांना पाहतांच माझ्या पोटांत आवळे शिजले. कशासाठीं ही स्वारी इकडे झुकली ? मला जाब विचारण्यासाठीं का ? माझं मन मला ग्वाही देत होतं, 'तूं दोषी नाहींस. तूं कोणतीहि सीमारेषा उल्लंघिलेली नाहींस. डरूं नको.' पण धाकधूक कमी होईना. दुपारीं जेवण अन् वामकुक्षी झाल्यावर आमच्या वडिलांकडे त्यांनीं जो प्रस्ताव केला तो ऐकून मग माझ्या जिवावरचं आधण उतरलं.

वृंदेची धाकटी बहीण मला द्यावी या उद्देशानं ते आमच्याकडे आले होते. ती दोनचारदा वृंदेकडे राहायला आली होती आणि आम्हां सर्वांच्या दृष्टीखालून गेली होती. नापसंत करण्याजोगं तिच्यांत कांहींच नव्हतं. हुंड्यापांड्याचाहि प्रश्न नव्हता. कारण, आमच्या समाजांत ती जीव हैराण करणारी चाल अजून सुरू झाली नव्हती. उभय पक्षांनीं आपल्या ऐपतीप्रमाणं जसं जमेल तसं कार्य करायचं, हा साधा उघडा व्यवहार. त्यामुळं तो प्रस्ताव निर्णयाच्या सीमेपर्यंत जायला वेळ लागला नाहीं.

आता मात्र मी वृंदेच्या भेटीची तांतडीनं अपेक्षा करीत होतों. 'भावोजी' या नात्यानं मी आतां तिच्याशीं साखसुरतपणें बोलणार होतों—चोच मारायला टपलेल्या कावळ्यांच्या नाकावर टिच्चून ! तिच्या बहिणीचा मी

नवरा होणार या कल्पनेचा तिला किती हर्ष होतो अन् तो ती कोणत्या मधुर शब्दांत व्यक्त करते तें जाणण्यासाठीं मी अधीर झालों होतों आणि तसा योग दुसऱ्याच दिवशीं जुळून आला.

आमच्या कुळागराच्या पायथ्याला दक्षिणच्या बाजूनें एक खोल घळ होती. तिच्यांत काळ्या खडकाचं अंग भेदून कमरेएवढ्या उंचीवरनं एक झरा झुळझुळत होता. स्नानाच्या सोयीसाठीं आम्हीं त्याला दोन हात लांबीची एक पन्हळ जोडून त्याची जलधारा मध्यावर आणली होती. लहानथोरांना आंत उतरायला सोपं जावं म्हणून बाजूनं छानदार पायऱ्या बांधून काढल्या होत्या. अशोकवृक्षाच्या घन छायेंत जमिनीवर उडी घेऊन केतकींच्या मुळांना अखंड 'ओल्हासा' देत ती जलधारा पुढं थोड्याशा अंतरावर ओढ्याला आत्मर्पण करीत होती. उन्हाळ्यांत तिच्याखालीं घटका-घटका बसणं म्हणजे स्वर्गसुख वाटायचं.

तेंच सुख लुटण्यासाठीं त्या दिवशीं दुपारीं बारा वाजायच्या सुमाराला मी तिथं गेलों होतों. ती स्वच्छ, शीतल गंगा माझ्या मस्तकावर पडून 'पाप ताप' शमवीत होती. वरती अशोकाचे भले मोठे पुष्पगुच्छ लवून आले होते. भ्रमरांना चोरून त्या फुलांतला मधाचा अंश चाखणारे तांबडे 'हुमले' तृप्तीच्या भरांत खालीं उड्या टाकून वाहात्या पानांबरोबर तरंगत होते. जवळच्या केतकीवनांत खोल कुठंतरी कणीस उकलं होतं, त्याचा मादक गंध सगळीकडे भरून राहिला होता. अशा सुखमग्नतेत लहानपणीं पाठ केलेल्या गंगाष्टकांतले कांहीं श्लोक सहजपणें माझ्या मुखांतून निघूं लागले. 'गंधर्वामरसिद्धकिन्नरवधूत्तुंगस्तनास्फालितं—' हा चरण मी पुरता म्हणतों न म्हणतों तोंच वृंदा झऱ्याच्या पायऱ्या उतरूं लागली.

पुरती खालीं न उतरतां ती मधल्या पायरीवर बसली. ती पाणी नेण्यासाठीं किंवा तें निमित्त करून तिथं आली असावी. हातांतली मातीची घागर पायाखालच्या पायरीवर टेकून ठेवून तिनं पदराच्या टोकानं गळा नि तोंड पुसून घेतलं. मध्यान्हीच्या वेळीं सूर्यकमळावर जी एक सतेज रक्तकान्ति खुलते, तीच या वेळीं तिच्या मुखावर खेळत होती. मीं मनांत म्हटलं, माझी पत्नी होणारी हिची धाकटी बहीणहि आणखी चार वर्षांनीं अगदीं अशीच मादक, मोहक दिसेल.

" आज एवढा उशीरसा केलास ? " असं म्हणत तिला जागा करून देण्यासाठीं मी पायरीवरून बाजूला झालों. अंग पुसून अन् तांब्या घेऊन मीं जायची तयारी केली तरी ती जागची हालेना. माझ्या सुस्नात देहाकडे दृष्टि स्थिर करून ती तशीच बसून राहिली होती.

" तूं अशी वाट अडवून बसलीस, तर मी जाऊं कसा ? खालीं तरी उतर, नाहीं तर वर तरी जा ! "

" वर येण्यासाठींच धडपडतें मी; पण त्या कामीं तुझं साह्य हवं. तूं धरशील का माझा हात ? काढशील का मला वर ? "

" असलं कोडं घालूं नकोस मला. "

" कोडं घालण्यासाठीं नव्हे, तर कोडं उलगडून घेण्यासाठीं मी विचारतें."

" म्हणजे ? "

" माझी बहीण तुला सांगून आली आहे; तुम्ही होकार दिला आहे. मुहूर्तहि ठरला आहे. खरं ना ? "

" हें जितकं मला, तितकंच तुलाहि माहीत आहे. "

" तें खरं; अन् म्हणूनच मीं सांगतें, कीं हें लग्न तूं मोडलं पाहिजेस."

" मोडलं पाहिजे ? कां बुवा ? मी, जन्मभर ब्रह्मचारी राहावं असं वाटतं कीं काय तुला ? का तुझ्या बहिणीपेक्षां मला एखादी चांगली वधू शोधून काढली आहेस ? "

" होय, काढली आहे. "

" कुठं आहे ती ? "

" ही तुझ्यासमोर. वृंदा तिचं नांव ! "

मला एकदम धक्काच बसला तें ऐकून. कानांवर विश्वासच बसेना. उजव्या हाताच्या पांच बोटांत धरलेला तो तांब्या गळून पडतो कीं काय असं वाटलं. अवचित आघाताची ती कळ शमायला कांहीं क्षण जावे लागले. नंतर माझा मलाच मी प्रश्न केला, ' असं काय बोलते ही वृंदा ! हिला वेड तर लागलं नाहीं ? हिच्याशीं लग्न– कसं शक्य आहे हें ! '

" असा ' मुखस्तंभ ' राहूं नको. ' हो ' म्हण ना ! तुझ्या एका शब्दासाठीं माझा जीव गोळा झाला आहे. "

" पण...पण...तुझी बहीण—"

" तिची नको तुला काळजी. तिला दुसरं स्थळ मिळेल. मला मात्र तुझ्यावांचून दुसरा आधार नाहीं."

" हें शक्य आहे का वृंदा ?"

" कां शक्य नाहीं ? मीं नाकींडोळीं कुरूप आहें का काळीबेंद्री आहें ? बघ एकदा उघड्या डोळ्यांनीं माझ्याकडे. कोणती खोड ठेवशील मला तूं ? या वाहत्या झऱ्याइतकीच मी निर्मळ आहें, शुद्ध आहें."

ती त्याच पायरीवर उठून उभी राहिली. तिनं जो एक दीर्घ श्वास आंत घेतला, त्यानं तिचं 'बंदिस्त' हृदय फुलून आल्याचं मला दिसलं. तीच बोलत नव्हती; तिचे डोळेहि बोलत होते. इतकंच नव्हे, तर तिच्या मुद्रेवरची प्रत्येक रेषा बोलत होती. तिच्या डोळ्याला डोळा भिडवण्याचं सामर्थ्य माझ्यांत राहिलं नाहीं. केव्हां एकदां या 'प्रमदे'च्या तांवडींतून सुटेन असं मला झालं.

" वृंदा, केवढं संकट आणलंस तूं हें माझ्यावर ! माझे आईवडील डोकं आपटून घेतील मी असलं कांहीं केलं तर—"

" उगाच बाऊ करून दाखवूं नकोस मला. दगडावर डोकं आपटायला कुणाचा जीव वर आला नाहीं. चार दिवस वादळ होईल; पण कालांतरानं तें आपोआप शमेल."

" म्हणून काय झालं ? त्यांना आवडणार नाहीं तें करावंच कां म्हणून ?"

" आईबाप तुझे आहेत. अन् मी ? मी कुणीच नाहीं का तुझी ?"

" आहेस कीं; मी माझी बहीण मानतों तुला. तूं मला भाऊ मान. आपण त्या प्रेमानं एकमेकांच्या सुखदुःखांत सहभागी होऊं."

" सुदैवानं मला सख्खे भाऊ आहेत. त्या प्रेमाचा मला दुष्काळ नाहीं. त्या भावनेनं मीं तुझ्याकडे कधीं पाहिलं नाहीं. तूंसुद्धां वेळींअवेळीं कुळागरांत खेटे घालीत होतास ते माझ्या भगिनीप्रेमासाठींच होते नाहीं का ? सख्ख्या बहिणीविषयीं एक दिवस तरी कधीं एवढी उत्कंठा दाखविली आहेस का ? आपलं अंतःकरण तपासून पाहा एकदां. किती भरंवसा धरला होता मीं

तुझा ! प्रत्येक भेटीच्या वेळीं मला वाटे, की आज तूं माझ्या काळजांतला प्रश्न विचारशील, कीं ' वृंदा, माझ्याशीं लग्न करशील कां ? ' तुला जर माझ्याशीं जीवभाव जडवायचा नव्हता, तर कशाला मला खोटी आशा लावलीस ? कशाला बोलांची साखर पेरलीस ? कां माझ्या भावनांशीं असा निष्ठूर खेळ खेळलास ? ''

" आमच्या घरांतलं वातावरण तुला ठाऊक आहे. आजवर कितीतरी मोहाचे प्रसंग पुढं आले; पण तो प्रत्येक क्षण तुझी मूर्ति डोळ्यापुढं उभी करून मीं टाळला. चाळवणाऱ्या भावनांना तुझ्या आशेवर थोपवून ठेवलं. काय सांगूं अन् कसं सांगूं तुला ? उरावरचे घाव दाखवतांहि येत नाहींत अन् लपवतांहि येत नाहींत. एकदां कपाळ फुटल्यावर काय होतं माझं या घरांत अन् या गांवांत ? एक आपघर नाहीं तर बापघर ! मी माहेरीं गेलें असतें तर या कोंडमाऱ्यांतून तरी सुटलें असतें; पण मातीचे घास खाऊन इथं राहिलें ती कुणासाठीं अन् कशासाठीं याचा विचार कर..."

बोलतां बोलतां तिचा गळा दाटला. पदरानं तोंड झांकून घेऊन ती स्फुंदूं लागली. कुणी येईल, कुणी पाहील याचसुद्धां तिला भान उरलं नाहीं. माझीहि अवस्था अनुकंपनीय झाली. वृंदेला रडवण्यांत मला पुरुषार्थ वाटत नव्हता. तिची निराशा करण्यांत मला सुख नव्हतं. ती तळतळून बोलली, त्यांतलं एक अक्षरसुद्धां असत्य नव्हतं. माझे विचार-विकार केव्हाच ती पारखून बसली होती. माझं लग्न तिच्या मुळावर आलं होतं. मी दुसऱ्या कुण्या जिवाचा जोडीदार होण्यापूर्वी मला कायमचा आपलासा करण्यासाठीं तिचा हा निकराचा प्रयत्न होता. मला तिची दया आली. स्वतःच्या भित्रे-पणाची लाजहि वाटली. पण तोंडावाटे ती अपेक्षीत होती तो शब्दच निघेना.

" वृंदा, मला क्षमा कर ! नाहीं धीर होत मला ! " हींच दोन वाक्यं कशींबशीं मीं तिला ऐकवलीं.

" तहान लागली म्हणून पाणी मागायला आलें तर धोंडा कपाळीं घातलास माझ्या. ठीक आहे. मर्जी तुझी ! " असं म्हणून माघारीं वळण्या-साठीं पाऊल फिरवतांना त्या मातीच्या घागरीला धक्का लागला. गडगडत खालीं येतांयेतांच तिचा खुर्दा झाला. वृंदेनं क्षणभर त्या ठिकऱ्यांकडे पाहिलं

अन् ती अर्धवट आपल्याशींच म्हणाली, " जी गत या घागरीची तीच आतां माझी ! "

आणि दुसऱ्याच क्षणीं माझी वाट मोकळी झाली. मी घरीं येऊन पानावर बसलों. पण जिभेला रुचीच राहिली नाहीं. तसाच उठून खोलींत आलों अन् अंग टाकलं. थोड्याच दिवसांनीं माझ्या मांडवांत सनई-सूर वाजणार होते. ' कांकणभर सरस ' अशा आणखी दोन हातांनीं मी चतुर्भुज होणार होतों. एक नवं हृदय मला जडणार होतं. त्यासंबंधीं गेले दोन दिवस ' मधुकल्पनां'च्या पऱ्या माझ्या हृदयाच्या अंगणांत नाचत राहिल्या होत्या. पण आज दुपारीं त्यांचे पंख मोडले अन् त्या विकल होऊन पडल्या.

आई उमेदींत होती; वडील तिच्या भावनांना साथ देत होते. कार्याचे बेत रचले जात होते. दागिन्यांची चर्चा चालत होती. त्या दोघांच्या मनश्चक्षूंपुढें वृंदेची बहीण वावरत होती अन् माझ्यापुढं वृंदा ! स्वप्नांतसुद्धां तीच. विचारांच्या वातचक्रांत सांपडलों होतों मी. कुठं बाहेर पडावंसं वाटत नव्हतं, कुणाशीं बोलण्याचीहि इच्छा नव्हती. वृंदेच्या त्या शब्दांचे पुनःपुन्हां तडाखे बसत होते. मीं तिला कसलीच आणभाक दिली नव्हती; पण तरीहि माझा तो नकार विश्वासघाताच्या सदरांतच जमा झाला असता. वृंदा आतां काय करील ? कुठं जाईल ? हा निराशेचा धसका तिला सोसवेल का ? ती झुरूनझुरून प्राण टाकील, का स्वैरिणी बनून अनीतीच्या मार्गानं अधःपात करून घेईल ? कांहीं कळत नव्हतं. दोन्ही परिणाम संभवत होते. आणि त्यापैकीं कोणताहि जन्मभर माझ्या अंतर्यामाला डाग देत राहणार होता.

शेजारच्या पांच सवाष्णी बोलावून आईनं आज माझ्या लग्नाचे पापड करण्याचा घाट घातला होता. हातानं काम चालू असतां त्यांच्या ' गांव गोष्टी ' रंगांत आल्या होत्या. अशा वेळीं वृंदा अन् तिच्या घरांतले ते घर्टिगण यांचा विषय चर्चेला पुढं येणं अपरिहार्य होतं. पिकल्या केसांचा सुपारीएवढा अंबाडा असलेली एक ' वृद्धा नारी ' आपल्या किनऱ्या आवाजांत बोलत होती,

" मला नाहीं बाई या वृंदेचं भवितव्य ठीक दिसत ! मागच्या पिढींत घडला तसलाच प्रकार हिच्याहि बाबतींत एखादे दिवशीं पाहायला मिळायचा. दैत्यांच्या कुळांत असल्या गोष्टी न घडल्या तरच नवल ! "

आणि त्यानंतर तिनं जो इतिहास सांगितला त्याचा सारांश असा होता—

मागच्या पिढींतहि वृंदेचा सासरा धरून तिघे-चौघे भाऊ होते. त्यांचीहि तऱ्हा हीच. घरांत एक विधवा भावजय होती. त्यांतल्या कुणीतरी एकानं तिला वांकड्या वाटेनं नेलं होतं. त्याचा जो व्हायचा तोच परिणाम झाला होता. त्या अभागिनीला आधीं गावांतल्या बायकांनीं मधें घेऊन तिच्या 'वाढत्या' पापाची विचिकित्सा केली होती. नंतर ग्रामस्थांनीं गांवकीच्या मेळ्यापुढं तिला उभी केली होती. ग्राम्य शब्दांनीं तिची विदारणा करून तिचा कबुलीजबाब घेतला होता. त्या घरावर सामाजिक बहिष्कार पडला होता. तालुक्याच्या फिरंगी अधिकाऱ्यापुढं फिर्याद गुदरली गेली होती. हें प्रकरण आपल्या अंगावर चांगलंच शेकणार हें त्या भावांच्या लक्षांत आलं होतं; आणि त्यानंतर एका रात्रीं ती बाई बेपत्ता झाली होती. पुनश्च ती त्या गांवांतच नव्हे, तर जगांतहि कुणाला दिसली नव्हती. ते वाटेल त्या थापा देत; पण गांवकऱ्यांना काय कळायचं तें कळून चुकलं होतं......

मीं तो भीषण वृत्तांत श्वास रोधून ऐकला. त्या बाईला मीं पाहिलेली नव्हती; पण तिची जी विटंबना अन् जो अघोरी अंत झाला त्या प्रत्येक अवस्थेंत तिच्या जागीं मला वृंदा दिसूं लागली! वृंदेचं तें कल्पनागम्य चित्र आपल्या डोळ्यांतली आग ओकीत मला म्हणूं लागलं, 'दिनकर, जितेपणीं मला या नरकयातना भोगवल्यास त्या तूं. मी तुला क्षमा करणार नाहीं; देव तुला क्षमा करणार नाहीं; ज्याच्याजवळ माणुसकीचा अंश आहे असा कुणीहि तुला क्षमा करणार नाहीं!'

या कल्पनेसरशीं माझं सर्वांग थरारलं. मीं बसलों होतों तो उभा झालों. 'नाहीं. मी हें होऊं देणार नाहीं. वृंदा माझी आहे; तिच्यावर पापाची कृष्ण छाया मी पडूं देणार नाहीं.'

मीं पडवींत येऊन आईला म्हटलं, "आई, तूं तयारी करूं नको. हें लग्न होणार नाहीं. मुलीच्या बापाला कळव, बाबांनाहि सांग, कीं हें लग्न मोडलं!"

बांगड्यांची किणकिण उठवणारे सगळ्या बायकांचे हात एकदम थांबले. आई माझ्या तोंडाकडे बघतच राहिली. माझे शब्द तिच्या जिव्हारीं लागले हें तिचे डबडबलेले डोळेच सांगत होते. ज्याचं शुभमंगल व्हायचं तोच हे

अशुभ, अभद्र शब्द उच्चारीत होता. तिच्या मातृहृदयाला हें कसं सहन व्हावं ?

" गेले चार दिवस हें काय मांडलं आहेत तूं ? काय आहे तुझ्या मनांत ? " ती काकुळतीला आली.

" माझ्या मनांत जें आहे, तें तुला रुचणार नाहीं. बाबांना, नातलगांना, शेजाऱ्यांना, कुणालाच रुचणार नाहीं. पण मी तें करणार आहें ! "

मी तसाच तिथून सटकलों. वृंदेची ही कुळागरांत येण्याची वेळ आहे हें मला ठाऊक होतं. त्याप्रमाणं ती आली होती. आज तिच्या बागेचं शिंपणं होतं. वरचं सगळं शिंपून झालं होतं. वहाळाच्या कडेचे फक्त चार ' माग ' तेवढे शिंपायचे राहिले होते. एका मागांत पाणी सोडून ती कडेला जाऊन बसली होती. तिला पाहतांक्षणीं मी चांगलाच चरकलों !

चार दिवसांपूर्वीची वृंदा आज राहिली नव्हती. तिच्या मुद्रेवरची कांति मावळली होती. डोळ्यांतली चमक ओसरली होती. अणुरेणूंत भरलेल्या ग्लानीमुळें तिचे अवयव जड जड झाले होते. कुडींत जणूं जीवच उरला नव्हता. ज्या तऱ्हेनं ती कुठं तरी पहात होती, त्यावरून तिचं हृदय ' शून्य-मंदिर ' झालं आहे असं वाटत होतं. अगतिकता हा एकच भाव तिच्या गात्रांवर रेंगाळत होता. जणूं गौतमाच्या शापानं शिळा झालेली दुसरी अहिल्याच !

पण मी ' राम ' होऊन आलों होतों. तिच्या शापावर माझ्याकडे उःशाप होता. माझ्या एकाच संजीवक दृष्टिपातानं ती सुकलेली, वणवलेली वेल तरारणार होती. तशा आत्मविश्वासानं मी पुढं गेलों. पण तिनं कसलीच हालचाल केली नाहीं. ' वृंदा ' अशी भावपूर्ण हांक मीं मारली. पण तिची नजर माझ्याकडे वळली नाहीं. ' मी तुझ्याशीं लग्न करायचं ठरवलं आहे; हांस पाहूं आतां.' हा शेवटचा बाण भात्यांतून काढला; पण तिच्या आत्मज्योती-वरची काजळी झडली नाहीं. तिनं आपलं मस्तक असहाय्यपणें मागच्या पोफळीला टेकलं, डोळ्यांचीं कवाडं बंद केलीं अन् त्याच स्थितींत मान हालवीत उदास, निष्प्राण शब्दांत म्हटलं,

" आतां वेळ गेली माझ्या राजा ऽऽ ! देवाच्या पूजेसाठीं जें जतन करून ठेवलं होतं, त्याचा राक्षसानं वास घेतला ! प्रतिकाराचं बळ उरलं नाहीं माझ्या अंगांत त्या वेळीं ! "

आणि वृंदा एकदम पांढरी फटफटीत पडली. तिच्या त्या शब्दांत लपलेला तो घृणास्पद ध्वन्यर्थ प्रतीत होऊन माझं मन कचरलं; पण मीं त्याला निश्चयाच्या वेदीवरून खालीं उतरूं दिलं नाहीं. जें आपलं तें कशाहि परिस्थितींत आपलंच असलं पाहिजे ही भावना दृढ करून निष्कंप शब्दांत मीं तिला म्हटलं,

" वेळ गेली नाहीं, वृंदा ! ती आत्तां, या क्षणीं आली आहे. मी देव नाहीं, त्यामुळं पूजेचा प्रश्नच उरत नाहीं. आपण आहों माणसं— दुबळीं अन् स्खलनशील. आधीं मीं चुकलों. नंतर तूं घसरलीस. यापुढं आपण एकमेकांना सांवरून घेऊं. मी भित्रा होतों; पण तुझाच होतों म्हणून शेवटीं तुझ्याकडे धांवत आलों. चल, ऊठ. निराशेची खोळ पांघरली आहेस ती दे फेंकून. "

" दिनकर, तूंच का हें माझ्या कानांत अमृत ओततो आहेस ? हा भास तर नाहीं ना ! . . . मी याच जगांत आहे का ? "

" डोळे उघड, म्हणजे खरं काय तें कळेल. "

वृंदेचीं नेत्रदळं उमललीं. नकळत गालावर खळी पडली. तिच्या कुडींत प्राण भरायला वेळ लागला नाहीं. ती उठून उभी राहिली. आता तिला अन्य कशाचा आधार घ्यावा लागला नाहीं. आम्हांला समोरासमोर उभीं पाहून वारा वृक्षांच्या कानाशीं कुजबुजला. केळींनीं हात हालवले. पोफळींनीं माना डोलवल्या. आणि त्या ओढ्याच्या कांठावर फुलून राहिलेल्या जांभानं आपल्या फुलांतले तांबूस केसर आमच्या बाजूला उधळले.



# मोरभटजी ३

तुमच्या तळवणी गांवच्या उल्लेखनीय गोष्टी कोणत्या, असें जर एखाद्या ग्रामस्थाला विचारलें तर तो म्हणेल, ' या तुम्हांला दाखवतों. हें आमचं तळं अन् हे मोरभटजी ! '

ऐन उमेदीच्या वयांत मोरभटजी परदेशी झाले. भटकत भटकत तळवणीला आले. खांद्यावर पडशी अन् ' दिवटी मागून बुधली ' तशी त्यांची सहचारिणी, यापलीकडे त्यांच्या सत्तेचें कांहीं नव्हतें. ' वैदिक ब्राह्मण आहे; राहूं दे आपल्या गांवांत ' म्हणून गांवच्या पट्टेदारानें त्यांना थोडीशी जागा दिली. सगळ्या गांवकऱ्यांनीं मिळून त्यांना एक केंबळी घर उभारून दिलें. गांवतलें उपाध्येपणहि त्यांनाच मिळावें, अशी खटपट करण्यांत आली. कुठेंच कांहीं आधार नसलेले मोरभटजी त्या गांवांत स्थायिक झाले. आज त्यांची सत्तरी पुरी होत आली आहे. तरी म्हाताऱ्याचें हाडपेर मजबूत आहे.

तळवणी गांव त्यांना आवडलें, त्याचें मुख्य कारण म्हणजे तिथलें तळें. त्या गांवाची रचनाहि मोठी मनोवेधक होती. दक्षिणोत्तर दोन टेकड्या. पूर्व पश्चिम भागांत बाहेरच्या बाजूनें नांदतीं घरें. मध्यें कुळागराचा लंब चौरस पट्टा अन् सर्वांच्या केंद्रस्थानीं तें तळें.

तळें केवळ शोभेचें नव्हतें. तो गांव अन् तीं कुळागरें त्याच्या आधारावरच वसलीं होतीं. दोन्ही बाजूंच्या डोंगरांशीं हिरव्या रंगाची चढाओढ लावणाऱ्या तिथल्या पोफळी, त्या तळ्यांतला जीवनरस पिऊनच इतक्या डौलदार बनल्या होत्या. तिथल्या नारिंगी तोरिंगी रसदार, मधुर फळांनीं ओथंबत होत्या, त्याचेंहि कारण तळ्याचा ' ओल्हासा ' हेंच होतें. जमीन सकस, पाणी जोरकस, त्यामुळें रसबाळ्या केळींचे तोडलेले घड एका दादल्याला पेलत नसत. पोफळीचीं दोन शिंपटीं टाकलीं कीं, पाटी तब्बल भरे.

आजुबाजूचे गांवकरी तळवणीच्या लोकांना म्हणत. ‘ तुम्ही काय बाबांनो, सोनं पिकवणाऱ्या जमिनीचे धनी ! ’

तळ्यांत बरेच जिवंत झरे होते. ते कधींच आटत नसत. तळें नेहमीं तुडुंब भरलेलें असायचें. पूर्व-पश्चिमेच्या गांवकऱ्यांनीं आपापल्या बाजूनें दोन मोठाले पाट खोदले होते. त्यांच्या तोंडांवर तळ्याला भोकसे पाडले होते. त्यांत पोखरलेल्या पोफळीच्या डांबांचे तुंबे बसवले होते. सूर्यास्ताच्या वेळीं तळ्यांत उतरून तुंब्याच्या तोंडांत बोळा कोंबायचा कीं, पाणी झरझर चढूं लागे. सकाळपर्यंत तळें कांठोकांठ भरून राही. शिंपणेकऱ्यांनीं तुंब्यांत वांबू खुपसला कीं, बोळा बाजूला होऊन पैलवानाच्या पोटरीएवढा जलौघ पाटांत उड्या घेऊं लागे. गांवकऱ्यांनीं त्या मुख्य पाटाला आणखी फांद्या फोडून आपापल्या ठिकाणांत तें पाणी खेळवलें होतें. चार दिवसांच्या एका फेऱ्यांत त्या पाण्यानें कुळागरांतलें प्रत्येक झाड शिंपून निघे.

मोरभटजींचें घर त्या तळ्याच्या कांठीं इतकें जवळ होतें कीं, पिकलेलें भिरंड पाण्यांत पडून ‘ डुबुक ’ असा होणारा आवाजहि मोरभटजींच्या कानावर जाई. मासोळ्या झिम्मा-फुगडी खेळत असतांना त्यांनीं जर कमलिनीचा दांडा हालवला तर तें नाजुक दृश्यसुद्धां अंगणांत उभें राहून त्यांना पाहातां येई. मोरभटजींचा रिकामा वेळ या तळ्याच्या कांठींच कांहीं तरी काम करण्यांत जाई.

मोरभटजींच्या प्रदीर्घ जीवनकालांत जे हर्ष-शोकाचे प्रसंग उद्भवले ते सगळे त्या तळ्याला ठाऊक होते. त्यांना बऱ्याच कालानें पहिला मुलगा झाला, त्या वेळीं वंशवेल पालवल्याचा जो आनंद त्यांच्या चर्येवर उमटला त्याचा फोटो त्या तळ्यानें घेऊन ठेवला होता. तो अन् त्याच्यामागचींहि कांहीं अपत्यें काळानें ओढून नेलीं तेव्हां त्यांची अश्रूंनीं डबडबलेली करुणमूर्ति त्याच तळ्याच्या संथ पाण्यांत प्रतिबिंबित झाली होती. आणि जगून वांचून उरलेल्या एकुलत्या एका मुलीचें कन्यादान केल्यावर संसारांतून मोकळें झाल्याचा जो प्रशांत भाव त्यांच्या मुखावर स्थिर झाला; तोहि त्याच तळ्यानें आपल्या हृदयांत सांठवून घेतला होता. तें तळें जसें गांवाचें अन् गांवासाठीं, तसेच मोरभटजीहि आतां झाले होते.

सकाळीं तळ्याचा तुंबा सोडायला येणाऱ्या गांवकऱ्यांना मोरभटजी प्रातःस्मरण म्हणत तळ्याकांठच्या जास्वंदीचीं किंवा तगरीचीं फुलें तोडतांना आढळायचे. संध्याकाळीं तळ्याला 'फूग' घालायला येईल त्याला ते पंचाची घडी ठेवलेला डावा खांदा उडवीत संध्येला खालीं उतरतांना किंवा संध्या सारून परत जातांना दिसायचे. त्यांची भस्मचर्चित मूर्ति ओंजळ भरून अर्घ्य देतांना पाहिली कीं, पहाणाराला आपण पुनीत झालों असें वाटायचें. वेदमंत्रांच्या उच्च घोषानें त्यांनीं तिथलें वातावरण पावन केलें होतें. ते सूक्तें म्हणूं लागले कीं, आपले झुबके डोलावणाऱ्या पोफळी अन् सोपटें हालवणाऱ्या केळी त्या मंत्रांतले स्वराघातच दाखवीत आहेत कीं काय असें वाटायचें.

जीवनांतले कित्येक रखरखते उन्हाळे अन् 'धो धो' पावसाळे मोरभटजींनीं सोसले होते; पण त्यांची हौस यत्किंचित्‌ही झिजली नव्हती. मोठ्यांत मोठे होऊन गंभीर गोष्टी बोलणें अन् शिंगें मोडून वासरांत शिरणें या दोन्ही गोष्टी ते सहजपणें करीत. अलिकडे गांवांतले त्यांच्या वयाचे बरेचसे म्हातारे खपले होते. कांहींनीं क्षीण, दुर्बल, होऊन आंथरुण धरलें होतें. त्यामुळें गांवचा कारभार तरुण पिढीच्या हातीं आला होता. ताज्या दमाचे गडी संसाराला लागले होते. पण मोरभटजी त्यांच्यापासून अलग न रहातां नव्या पिढींत नवे होऊन मिसळत होते. म्हातारीं माणसें तरुणांना बहुधा अडगळ वाटूं लागतात. पण तळवणीच्या तरुणांना त्यांचे मोरकाका मात्र रायत्यासारखे आवडत होते.

त्यामुळें त्यांच्या घरीं माणसांचा राबता फार असायचा. सकाळची दशमी त्यांनीं एकट्यांनीं बसून कधीं खाल्ली नाहीं. कुळवाडी, माळवाडी सुद्धां त्या बाजूला आला तर त्यांच्या चंचींतली चिमूटभर तंबाखू मागून घेतल्याशिवाय पुढें जायचा नाहीं. रात्रीं पत्ते खेळायची लहर आली कीं, पूर्वेच्या तरुणांनीं मोरभटजींच्या पडवीवर जमून पश्चिमवाल्यांना 'कुकारा' घालायचा. ती खुणेची साद मिळाली कीं, पश्चिमेच्या 'खेळियां'नीं जळतीं कोलितें विझवीत तिथें येऊन दाखल व्हायचें. खेळ त्यांचा; पण दिव्याचा सरंजाम, दूध, साखर, चहा, हें सगळें मोरभटजींचें. एक दिवस मध्यरात्रीं मधल्या विश्रांतीच्या वेळीं ऊन ऊन चहा पितांना एक जण म्हणाला,

" मोरकाका, आमच्यामुळें तुम्हांला त्रास होतो अन् तोशीसहि पडते. आम्ही यापुढें खेळायला जमलों कीं, चहापाण्यासाठीं वर्गणीच काढूं."
त्यावर मोरभटजी बोलले,

" मोठे आले आहेत वर्गणी काढणारे. तुमच्या वाडवडिलांनीं तरी काढली होती का कधीं? ते पण माझ्याच पडवींत खेळत होते. लेको, तुमच्या अकला वाढत चालल्या आहेत दिवसेंदिवस—"

अन् असें कांहीं तरी रागाचा अविर्भाव आणून ते बोलले कीं त्या तरुणांना आपल्या अंगावर बकुळीचीं फुलें पडल्यासारखें वाटायचें. मोरभटजींनीं कधीं कुणाला वाईट बुद्धि सांगितली नाहीं. कोणी आळसानें आपलें काम टाकून ओटीवर येऊन बसला तर ते त्याला सांगायचे, ' दिवसाचं काम पुरं केल्याशिवाय गप्पाष्टकं वर्ज्य, समजलं? जा आधीं कुळागरांत. ' कोणाच्याहि ठिकाणांतून जातांना एखाद्या माडाचा शेंडा भरलेला दिसला कीं तिथल्यातिथें मालकाला हांक मारून म्हणायचे, ' हा माड इतके दिवस बेणायचा कां ठेवलास? बाबारे, झाडापेडांचीसुद्धां मुलाप्रमाणें काळजी घ्यायला हवी. कुळागर संभाळणं सोपं नाहीं बरं? तिथें इंद्रासारखं ' सहस्राक्ष ' व्हायला हवं! '

त्या गांवांत समृद्धि होती तशीच एकीहि होती. एकाच्या घरीं कांहीं विशेष कार्य निघालें, कीं सगळे कंबरा कसून तें तडीला नेत. नेहमींच्या व्यवहारांतहि ज्याचें अडेल त्याला मदत करीत. सणवार हौसेनें फुलवीत. गणपति बसले कीं आळीपाळीनें प्रत्येकाच्या घरीं घुमटें वाजायचीं. मोरभटजी संबळ फार छान वाजवीत; म्हणून तेहि त्यांच्यांत असायचे. दिवाळींत पोहे खायला जमले कीं एकेकानें शेर शेर पोह्यांचा ठाव उठवायचा. बाहेर आले कीं वईवरच्या सुकलेल्या वेलाचें एक पिवळें कारिंट तोडून मोरभटजींनीं कोणाला कळूं न देतां एकाद्याच्या अंगावर मारायचें अन् मग जी फेकाफेकी अन् चुकवाचुकवी चालेल, ती तंबाखू चघळीत स्वस्थपणें पहात बसायचें.

तळवणीच्या एकजुटींत कोणा परक्याला हातबोट खुपसायला धीर होत नसे. ' वाघ वांशेल ' सुद्धां तळवणीच्या तरुणांना वचकून असत. झडलेला नारळ अन् गळलेलीं पोफळें झाडाखालीं तश्शीं पडून राहात. तीं उचलायला

चोराचा हात धजावत नसे. परगांवचा पाहुणा कांहीं कामासाठीं तळवणीला आला कीं, तिथलें प्रेमसुख भोगण्यासाठीं एकादा दिवस अधिकच राही.

पण ही स्थिति फार दिवस टिकली नाहीं. नियतीचें चक्र फिरलें. एक दिवस पूर्वेकडच्या एका महाभागाच्या पोटीं कलि रिघला. अन् दुधांत मिठाचा कण पडला. गांवच्या सुखाला दृष्ट लागली. प्रेमबंधांचे तगावे तुटले. सगळेंच उलटेंपालटें झालें.

पूर्वेच्या बाजूनें तळयाला एका खेकड्यानें लहानसें 'रळ' पाडलें होतें अन् त्यांतून पाण्याचे पाझर जवळच्या कुळागरांत झिरपत होते. त्या कुळागराच्या मालकानें तें पाहिलें अन् त्याला वाटलें कीं, '·ही बरी युक्ति आहे.' त्यानें एक वांसा त्या रळांत सारला अन् तें मोठें केलें.. त्यासरशीं पाण्याचा लोंढा तिकडे फुटला अन् त्याचें कुळागर अनायासें शिंपून निघालें. पण त्यामुळें पश्चिमेकडे ज्याचें शिंपणें चालू होतें, त्याला पाणी अपुरें पडलें. तो तळयावर येऊन पहातो तों हा प्रकार. त्यानें कर्त्याला जाब विचारला. पण त्यानें खेकड्याचें नांव सांगून कानावर हात ठेवले.

पण ज्या गांवच्या केळी त्याच गांवच्या पोफळी. खेंकडा कसें अन् केवढें रळ करतो तें काय त्याला ठाऊक नव्हतें! त्यानेंहि दुसऱ्या दिवशीं एक खेकडा कामाला लावला अन् थेट तुंब्याखालींच तळयाला भोंक पाडलें. त्यामुळें पश्चिमेचा संबंध पाटच ओसंडत वाहूं लागला. त्याच प्रमाणांत पूर्वेस पाट कोरडा पडला. कित्येकांचीं शिंपणींच नव्हेत; तर धुणींपाणींसुद्धां राहिलीं. ते सगळे लोक जमाव करून तळयाच्या बांधावर आले अन् त्यांनीं पश्चिमेच्यांना आव्हान केलें. 'वांकड्या मेढीला वांकडं नेम!' पश्चिमेचे ग्रामस्थ उत्तर देऊन मोकळे झाले.

पुढें हळूहळू बाचाबाचींना सुरुवात झाली. एक-दोन मारामाऱ्याहि झाल्या. मिटलेलीं सीमेचीं भांडणें उकरून काढून उभय बाजूंचे लोक दुसऱ्याच्या हद्दींतलीं झाडें पाडूं लागले. डिचोलीच्या कोर्टांत दिवाणी अन् फौजदारी खटले सुरू झाले. तिथल्या खानावळवाल्याचें उत्पन्न वाढलें. वकिलांची धन झाली. कोर्टांत खेटे घालण्यापायीं कुळागरावरचें लक्ष उडालें. केळी पोफळींचीं रया गेली. दुसऱ्या पक्षाला दमावण्याच्या ईर्षेंत अन् प्रयत्नांत ते स्वतःच दमूं लागले. कित्येकांनीं गोठ्यांतल्या तान्ह्यां गायी विकून पोरांबाळांच्या

तोंडची धार मुकवली. कित्येकांनीं सोन्याचांदीला बाजार दाखवला. कित्येकांवर कुळागरच गहाण ठेवण्याची पाळी आली.

गांवांत पूर्व आणि पश्चिम यांमध्यें एक अदृश्य भिंत उभारली गेली. पूर्वेच्या गांवकऱ्यांनीं पश्चिमेच्या लोकांकडचें येणें जाणें बंद केलें. पश्चिमेच्या लोकांनींहि तोच धडा गिरवला. भाषणसुद्धां वर्ज झालें. इकडचें पोरच नव्हे; तर मांजरसुद्धां तिकडे खपेना. मध्यस्थ होते ते मोरभटजी. त्यांना कोणताहि पक्ष नव्हता. या दुफळीमुळें ते कष्टी झाले. त्या वर्षांची दिवाळी दोन्ही गटांनीं वेगवेगळी साजरी केली. मोरभटजींना दोन्हीकडचें बोलावणें होतें. पण ते तोंड चुकवून दूर कुठेंतरी जाऊन बसले.

ह्यातींत कधीं न पाहिलेलें ते आज पहात होते. न अनुभवलेलें अनुभवीत होते. दोन्ही पक्ष आपल्या बाजूचे होण्याबद्दल त्यांना गळ घालीत, त्यावेळीं ते कातर शब्दांत म्हणत. ‘ कशाला माझी म्हाताऱ्याची ओढाताण करतां ! मला पक्ष नाहीं. मी सर्वांचा आहे. सर्व माझे आहेत. डाव्या उजव्या डोळ्यांपैकीं मी कोणाला गोंजारूं अन् कोणाला फोडूं ! ’

गांवांतली ही दुही मोडण्यासाठीं त्यांनीं एक दोनदां प्रयत्न केला. कोणत्याहि पक्षांतल्या एकेकट्या माणसाला त्यांचें बोलणें पटे. चाललें आहे तें हिताचें नव्हे, हें तो मोकळ्या मनानें कबूल करी. पण दोन्हीं पक्ष मोरभटजींच्या पडवीवर जमले कीं शब्दानें शब्द वाढे अन् आकाराला आलेली तडजोड फिसकटे. आणि मग चार आठ दिवस मोरभटजी खट्टू होऊन बसत.

एखादा सार्वत्रिक धर्मकृत्याचा सणवार आला कीं त्यांची याहून अधिक पंचाईत होई. उपाध्ये म्हणून ते पूर्वेकडे आधीं गेले कीं पश्चिम रुसे. अन् पश्चिम आधीं घेतली तर पूर्वेला वाईट वाटे. असें झालें कीं मग मोरभटजी हरताळकेच्या पूजा सांगायला पूर्वेकडे गेले तर दुसऱ्या दिवशीं गणपति बसवायला आधीं पश्चिमेकडे वळत.

आपल्या घरचा गणपति दरवर्षीं ते सात दिवस ठेवीत. पहिल्या पांच दिवसांत सगळीकडच्या समाराधना, मंत्रजागर अन् उत्तरपूजा आटपल्या कीं मग सावकाशपणें सातव्या दिवशीं ते आपल्या घरची समाराधना करीत. त्या दिवशीं गांवांतली लहान थोर सर्व मंडळी त्यांच्या घरीं जेवायला यायची.

काकीनें भिक्षुकीचे आलेले नारळ फोडून उकडीचे मोदक करायचे. दारांतल्या मांडवावरचें ‘ तवसें ’ काढून झकास ताकाचें सांबारें रांधायचें. संध्याकाळीं आरती, मंत्रपुष्प अन् गणपतीचें विसर्जन झाल्यावरच सगळयांनीं आपापल्या घरीं जायचें.

या वर्षीहि त्यांनीं सगळयांना बोलावणें केलें होतें. आपला विरोधी पक्ष तिथें येणार हें ठाऊक असूनहि दोन्ही बाजूंचे लोक जेवायला आले होते. त्यांना येणेंच भाग होतें. मोरकाकाचें आमंत्रण झिडकारण्याइतकी बेपर्वाई अजून त्यांच्या अंगीं आली नव्हती. योग्य वेळीं मोरभटजींनीं ब्राह्मणभोजनाचें उदक सोडलें. वरणभात झाल्यावर काकी मोदक वाढायला पुढें झाली. पण प्रत्येकजण ‘ एक वाढा, अर्धाच वाढा ’ असें करूं लागला.

“ अरे हें रे काय ? दरवर्षी एकवीस मोदकांची पैज मारणारे तुम्ही, अन् आज हें काय मांडलं आहे असं ? आमच्या गणपतीला उपाशी ठेवणार आहांत वाटतं ? तें कांहीं चालायचं नाहीं, बरं ! ” असें म्हणून मोरभटजी काकीच्या हातांतली परात घेऊन स्वतः वाढायला उठले.

पण तरीहि प्रत्येकजण पानावर ओणवा होऊं लागला. डोकं जमिनीला टेकवूं लागला. कसें खातील ते ? निःसंकोच मनाचा उल्हास होताच कुठें त्यांच्याजवळ ! कारण शेजारीं अन् समोर त्यांचे प्रतिस्पर्धी होते ना बसलेले. कशी तरी वर्षाची एक ‘ बाब ’ पुरी करायला, मोरभटजींच्या ‘ डोळयांना पाणी ’ लावायला आले होते ते.

बिचारे मोरभटजी हिंपुटी झाले. पंगत उठल्यावर स्वैंपाकघरांत जाऊन पाहतात तों ‘ महाप्रसाद ’ तस्सा उरलेला. ‘ गणरायाची इच्छा !’ म्हणून त्यांनीं एक दीर्घ श्वास टाकला. दुसऱ्यानें पोटभर खाल्ल्यानें अंतरीं तृप्त होणारा तो भिक्षुक ब्राह्मण त्या दिवशीं जेवूनहि उपाशीच राहिला.

चौथ्या प्रहरीं गुलबाक्षी फुलल्यावर मोरभटजी स्नान करून अन् धूतवस्त्र नेसून उत्तरपूजेला बसले. सर्व मंडळी गणपतीपुढें घातलेल्या बैठकीवर आसनस्थ झाली. काकीनें तसराळ्यांत घालून ठेवलेल्या पंचखाद्याचा नैवेद्य दाखवून त्यांनीं पंचारती पुढें घेतली. काकीनें चकचकीत मोठ्या ताम्हनांत मधें रांगोळी काढून तिच्यावर दोन नीरांजनें ठेवलीं होतीं अन् कांठाला

तेरड्यांचीं फुलें हारीनें बसवून तें सजवलें होतें. नीरांजनें समईवर पेटवीत असतां ते मंडळींना म्हणाले,

" आरती सुरू होऊं द्या."

लगेच पूर्वेचा एकजण झांज घेऊन आरती म्हणूं लागला. पश्चिमेच्या लोकांनीं घुमटें उचललीं. पण आंकड कडव्यांची दुगुण म्हणून अन् 'पडण' घालून म्हणणारा थांबला, तरी घुमटवाले आपली 'त त थोम् थोम् था' ही गत वाजवीतच राहिले. कारण वाजवणारांचीं तोंडें म्हणणाऱ्याकडे नव्हतींच मुळीं. असा विचका झाल्यावर म्हणणारा पुढें तोंडच उघडीना. तो गप्प झाला तशी घुमटवाल्यांनीं आपलीं वाद्येंहि खालीं ठेवलीं. मोरभटजी 'आ' करून पाहातच राहिले.

नंतर पूर्वेच्या लोकांनीं घुमटें उचललीं अन् म्हणणाऱ्याला पुढें सुरू करायला सांगितलें. पण संबळवाला पडला पश्चिमेचा. मोरभटजींचाच शिष्य होता तो. विजेसारख्या त्याच्या हातांतल्या काठ्या लवलवत. घुमटावरच्या दोन थापांच्या मध्यंतरींचा अवकाश भरून काढणें हें त्याचें काम; पण आज त्यानें साथ करण्यासाठीं काठ्या उचलल्या नव्हत्या, तर घुमटवाल्यांच्या लयींत ओढाताण करून त्यांना चुकवण्यासाठीं. त्यामुळें दुसऱ्याहि कडव्याचा बेरंगच झाला.

दरवर्षीं मोरभटजींकडच्या आरती दोन मैलांवरून कानांवर आदळायच्या. उत्साहाची धुमाळी धिमधिमायची. वेगवेगळ्या तोडींच्या ठेवणींतल्या आरती त्या दिवशीं बाहेर निघायच्या. एक दोन घुमटांचीं तरी शकलें उडायचीं. वाजवणारांनीं बेभानपणांत हात सुजवून घ्यायचे. मग मोरभटजीहि असे रंगांत यायचे कीं आपण सोवळ्यांत आहों हें विसरून त्यांनीं संबळ पुढें ओढायचा.

पण आज सगळाच बेरंग. सगळाच विस्कळीतपणा. प्रत्येकाच्या मनांत अढी; तिथें संगीत प्रगटणार कुठून ! सकाळपासून एकेक गोष्ट त्यांच्या जिव्हारीं लागत होती. त्यांत या आरतीच्या प्रकारानें तर कळसच झाला. वर्षांतला त्यांचा हा 'सोनियाचा दिवस !' पण त्याच्यांतला रस आटून गेला. मोरभटजींच्या हृदयाला कळा लागल्या. जीव आकुळ-व्याकुळ झाला. आपण आपल्या कुब्या अन् तेढ्या वागणुकीनें म्हाताऱ्याच्या प्रेमळ हृदयाचें विंधान करीत आहों, याची एकालाहि जाणीव नव्हती. ते आपले अंतर्गत विरोध मनांतल्या मनांत उगाळीत बसले होते.

मोरभटजींनीं त्या आरतीवाल्यांना 'पुरे आतां,' म्हणून लगेच गणपती-कडे तोंड वळवलें. कापूराची वडी हलकारतीवर पेटवून ठेवून त्यांनीं सुरू केलें. 'कर्पूरगौरं करुणावतारम्--'

पुष्पांजली घेऊन उभे राहिल्यावर मंत्रपुष्प म्हणतांना त्यांची एकटक दृष्टी मोरयाच्या मुखाकडे लागली होती; अन् तिच्यांतून करुणेचे द्रव झिरपत होते. 'यान्तु देव--' म्हणून गणपतीवर विसर्जनाच्या अक्षता टाकीत असतांना कोणीं जर त्यांचें मुख न्याहाळलें असतें तर ते जणूं स्वतःच्या जीवनावरच 'अक्षता' टाकीत आहेत असेंच त्याला वाटलें असतें. गणपतीच्या दुमडलेल्या सोंडेवर दह्याची कवडी सोडीत असतांना त्यांचा हात लटलटत होता. सज-वलेल्या मखरांतून मूर्ति उचलून त्यांनीं खालच्या पाटावर ठेवली अन् ते घळघळा रडूं लागले. त्यांच्या खांद्यावरचा सुका पंचा चिंब भिजला. त्यामुळें काकीचीहि अवस्था अनावर झाली. जमलेल्या तरुण मंडळींनीं तरी मोरभट-जींच्या डोळ्यांत अश्रूंचा खळाळ कधीं पाहिला नव्हता. आपल्या चमत्का-रिक वर्तनामुळें म्हातारा रडला ही त्यांना आतां जाणीव झाली. ते अंतरीं शरमले.

तळ्यांत बुडवण्यासाठीं जेव्हां त्यांनीं गणपती उचलला तेव्हां ते काकीला म्हणाले, 'तूंही चल आज माझ्याबरोबर! अन् हें बघ. माझं पांघरायचं धोतर, दोन पंचे अन् तुझं लुगडं एवढ्याचं बोचकं बांधून घे. तांब्यांत चार पैसे असले तर कडोसरीला लाव.' ते अन् त्यांच्या मागून सर्व मंडळी आंगणांत आली तेव्हां ऐन कातरवेळ झाली होती. दोडकीचीं फुलें पूर्ण उमललीं होतीं. टाकळ्यानीं पानें मिटून घेतलीं होतीं. तान्ह्या गायी गोठ्याच्या दाराशीं येऊन वासरासाठीं हंबरूं लागल्या होत्या. नुकतीच पावसाची एक 'दडक' पडून गेली होती. अन् झाडांच्या शेंड्यांत सांकळलेल्या पाण्याचे ओथवळे सगळ्यांच्या अंगावर टपटपत होते. तळ्याच्या परिसरांत अंधार दाटूं लागला होता.

मोरभटजी तळ्यांतल्या कंबरभर पाण्यांत उतरले. गणपति तीन वेळ खालीं वर करून त्यांनीं तळाशीं अलगद सोडला. वर उठलेल्या बुडबुड्यांकडे भक्तिपूर्ण दृष्टीनें पाहिलें. परत कांठावर येऊन त्यांनीं एकवार सगळ्या आस-

मंतावर दृष्टिक्षेप केला. दाटून येणारे उमाळे निग्रहानें दाबून टाकले. आणि काकीनें आणलेलें बोचकें उचलीत ते सर्वांना उद्देशून बोलले,

" बरं आहे मंडळी, हा शेवटचा नमस्कार तुम्हांला. येतों मी आतां !"

निरभ्र आकाशांत वीज उजाळलेली पाहून माणूस जितका चमकणार नाहीं, तितके ते तरुण ग्रामस्थ चमकले. त्यांच्यापैकीं एकानें विचारलें,

" म्हणजे काय मोरकाका ? कुठें निघालांत तुम्ही ?"

" हा गांव सोडून दूर कुठेंतरी ! बहुधा नरसोबाच्या वाडीला. दत्त दिगंबराच्या पायाशीं. आज उणं-पुरं एक वर्ष यातना सोसल्या. आतां नाहीं सोसवत. तुमचीं भांडणं बघून डोळे फुटले, काळजाला भेगा पडल्या. तुमच्या वैराच्या आगींत मी अंतर्बाह्य होरपळून निघालों. आजवर तुमच्यांत रमलों, मिसळलों. माझीं मुलं गेलीं त्यांच्याजागीं मीं तुम्हांलाच मानलं. तुमच्याच बऱ्याभल्याची चिंता वाहिली. माझे आतां दस गेले अन् पुरते पांचसुद्धां उरले नाहींत. माझी एकच आशा आतां उरली होती कीं, तुम्ही सगळे उशापायथ्याशीं बसलेले असतांना समाधानानं कुडी सोडावी. पण नाहीं माझ्या नशिबीं तें..."

मोरभटजी उघडे होते. त्यांचा नेसता पंचा थबथबीत ओला झाला होता. गारठ्यानें त्यांचीं हाडें कुडकुडत होतीं. मधून मधून पडणाऱ्या पावसाच्या सडसडाटानें त्यांचें अंग शहारत होतें. खंबीर होता तो अंतरांतला निश्चय !

" वाडीला जाऊन काय करणार तुम्ही मोरकाका ?"

" गुरुचरित्र वाचीन. देवाला प्रदक्षिणा घालीन. अन् कळवळून त्याची प्रार्थना करीन. "दत्तराजा, देह पडायच्या आधीं एवढी वार्ता माझ्या कानांवर घाल कीं, तळवणीचे ग्रामस्थ वैर विसरून पुनश्च एक झाले ! दूध साखरेसारखे एकमेकांत मिसळले. पोरांनो ! मीच नव्हे, तर माझीं कृष्णानदींत पडलेलीं हाडंसुद्धां तुमचंच मंगल चिंततील."

इतकें बोलून कोणाच्या प्रत्युत्तराची वाट न पाहतां ते कुळागराचे ओटे उतरूं लागले. काकीनेंहि त्यांचा मागोवा घेतला. दोन आकृति तळ्यापासून दूर जाऊं लागल्या.

आतां मात्र सगळ्यांचें आंतडें पिळवटलें. 'मोरकाका' हें त्या सगळ्या तरुणांचें आदराचें अन् विश्वासाचें स्थान होतें. तें गांवांतलें पवित्र क्षेत्र होतें.

ते तरुण बाळपणापासून त्यांच्या घरीं खाऊन पिऊन धाले होते. त्यांच्या हृदयांतल्या निर्मल भावगंगेंत न्हाले होते. आणि आज करकरीत तिन्हीसांजा तो त्यांचा विसाव्याचा आम्रवृक्ष, दूरदेशच्या पंथाला लागला होता. अन् तोहि चडफडून, शापून नव्हे; तर कल्याणाचे आशीर्वाद देऊन ! त्यामुळें कसलें तरी एक कर्तव्य आपल्यापुढें उभें ठाकलें आहे असें सर्वांनाच वाटलें.

" आपले मोरकाका चालले. " पूर्वेचा एकजण पश्चिमेला म्हणाला.

" आतां काय करायचं ! " पश्चिमेनें पूर्वेकडे आशाळूपणें पाहिलें.

" त्यांना जाऊं द्यायचं नाहीं. सर्वांनीं मिळून अडवायचं अन् माघारी आणायचं. "

" चला तर ! "

दोन्ही गटांनीं दोन बाजूंनीं कुळागरांत उड्या घेतल्या. मोरभटजी शंभर पावलं चालून गेले नाहींत तोच सगळ्यांनीं त्यांना गराडा घातला. जे भावनाप्रधान होते, त्यांनीं सरळ गुडघे टेकून त्यांच्या पायांना मिठी घातली.

" मोरकाका ! तुम्ही जाऊं नका. आमचे अपराध पोटांत घालून माघारीं फिरा. आमचे डोळे उघडले. आम्ही सगळे एक झालों. झालं, गेलं विसरलों."

" खरं ? अगदीं खरं ? या तळ्याच्या पाण्याशपथ ? " जे जवळ उभे होते, त्यांना दोन्ही हातांनीं गोंजारीत मोरभटजींनीं विचारलें.

" या तळ्याच्या पाण्याशपथ ! " तळवणीचा आत्मा सर्व मुखांनीं उद्गारला.

" अरे, मग मी तुम्हांला सोडून जाईन होय ? जिथें तुम्ही सगळे, तिथें हा म्हातारा मोरभट—"

तात्काळ एका तरुणानें त्यांना खांद्यावर उचलून घेतलें. ' गणपति बाप्पा मोरया 'च्या गर्जनेनें उभें कुळागर निनादलें. थेट पडवीवर आणून त्यानें मोरभटजींना खालीं उतरवलें. सगळे माजघरांत गणपतीच्या मखराजवळ गेले. रिवाजाप्रमाणें सर्वांनीं मिळून आरतीचें एक कडवें म्हटलें. तो स्वर, तो घोष इतका एकजीव होऊन वातावरणांत उठावला कीं, त्यामुळें काकडणाऱ्या मोरभटजींना आपल्या आक्रसलेल्या शरीरांत नवी ऊब, नवा प्राण संचरत आहे असें वाटलें.

● ● ●

## माहेरचें ‘ मूळ ’ ४

सकाळीं जयाचें लग्न झालें. दुपारीं गांवजेवणाच्या पंक्ति उठल्या. संध्याकाळीं ‘ ऐरिणीदान ’ झाल्यावर वधू-वरांच्या पदरांना गांठ बसली. आणि रात्रीं आठ वाजतां कोऱ्या अंजिरी साडीवर पिवळी ‘ अष्टपुत्री ’ पांघरून नव्या घरांत नांदण्यासाठीं जयानें माहेर सोडलें.

भरला मांडव रिता झाला. बाळूचें हृदयहि शून्यमंदिर बनलें. दोन दिवस लग्नघरचा हरकाम्या स्वयंसेवक झालेला बाळू, जयाची पाठ फिरतांच तिच्या आईवडिलांचा डोळा चुकवून आपल्या घरीं आला. अंधाऱ्या खोलींत दिवा न लावतांच त्यानें उशींत डोकें खुपसलें.

आज त्याची बाळपणापासूनची सखी दुसऱ्याच्या सत्तेची झाली होती. उद्यां सकाळीं त्याला तिची ‘ साखरसाद ’ ऐकायला येणार नव्हती. पाटाकडच्या तुरभुरलेल्या सुरंगीचे कळे काढून देण्याबद्दल उद्यां त्याला कोणाचा लकडा लागणार नव्हता. शेजारीं शेजारीं असलेल्या त्या दोन घरांना प्रेमानें सांधणाऱ्या त्या दोन जिवांपैकीं एक आज तब्बल चार कोसांच्या अंतरावर गेला होता.

हें असें कधींतरी होणार याची जाणीव बाळूला होती. पण जया एका पोक्त बिजवराच्या गळ्यांत पडेल हें मात्र स्वप्नांतसुद्धां त्यानें चिंतिलें नव्हतें. पण उजव्या हाताच्या करांगळीला फुटलेल्या सहाव्या बोटानें तिचा दावा साधला. ‘ रुपेकेगदी ’ सारखी रसरशीत मुलगी; पण सगळीकडून नकार घेऊं लागली. तिच्या रेशमी केसांची कोणी कदर केली नाहीं. रेखीव भुंवयांखालचीं तीं पाणीदार नेत्रदळें कोणालाच विलोभनीय वाटलीं नाहींत. विधात्यानें तिच्या हनुवटीवर हलक्या हातानें ठेवून दिलेला तो निळा नाजूक तीळ कोणाच्याच डोळ्यांत भरला नाहीं. सगळ्यांना अचूक दिसलें तें तिचें सहावें बोट मात्र ! हें अवलक्षण आपल्या घरांत नको म्हणून

प्रत्येक ‘ दुर्मुजी ’ नवरदेवानें तिला नाकारलें आणि अखेर तिचा स्वीकार करण्याचें कृपाळू धारिष्ट केलें तें एका तीन मुलांच्या बापानें.

जयाचा नवरा केवळ बिजवरच नव्हता; तर तिस्मारखानहि होता हें थोड्याच दिवसांत कळून आलें. पहिली माघारीण म्हणून जया चार दिवस माहेरीं राहून गेली असेल तेवढीच. पुढें सासऱ्याजांवयांचें कांहींतरी कारणावरून वितुष्ट आलें तें इतकें कीं, त्यानें जयाला माहेरची वाट कायमची बंद केली.

बाप कठोर होऊन बसला, त्यानें एक मुलीची वास्तपुस्त सोडून दिली, म्हणून आईचें आंतडें कसें स्वस्थ बसेल ? जांवयाचा राग शमावा म्हणून तिनें प्रयत्न चालू ठेवले होते. वेळोवेळीं गड्याच्या हातीं लाडू नेवऱ्यांचे डबेहि धाडून दिले होते. आणि आतां श्रावणांत मंगळागौरीच्या निमित्तानें तरी पोरगी पंधरा दिवस येऊन राहील अशा आशेनें ती माऊली ‘ करटींत गुंडे ’ घालीत बसली होती. बाळूहि त्याच आशेवर फुलला होता.

श्रावणपूर्णिमा होतांच, पुढें येणाऱ्या गणेशोत्सवासाठीं त्यानें आपल्या घरच्या भिंती पिवळ्या मातीनें सारवून घेतल्या होत्या. आणि दर्शनी भागाच्या भिंतींवर दाराच्या दोन्ही बाजूंनीं दोन छानदार ‘ कणे ’ तो जयाकडून काढून घेणार होता. डाव्या हातांत कालवलेल्या चुन्याची वाटी अन् उजव्या हाताच्या चिमटींत गवताची जाडशी काडी घेऊन ती आडव्या उभ्या रेघा ओढूं लागली कीं निर्वेधपणें घटका घटका तो तिच्याशीं बोलत बसणार होता.

पण हे सगळे मनचे मांडे अन् स्वप्नांच्या पुऱ्याच ठरल्या. जयाला आणायला गेलेला भागेली आंबट तोंड करून एकटाच परत आला. आई बिचारी रडत बसली अन् बाळूला तिचें कसेंहि सांत्वन करतां येईना. त्याच्याहि अंतरावर विषादाची छाया पसरली.

तब्बल वर्ष लोटलें; पण जया कांहीं माघारली नाहीं. पुढें कोणाकडून तरी बातमी कळली कीं, ती गर्भारशी आहे. नंतर कांहीं महिन्यांनीं आणखी एक वार्ता वाऱ्यावर उडत आली कीं, तिला मुलगी झाली अन् गेली. ती येत नाहीं तर आपणच एकदां तिच्याकडे जावें अन् मायेचा हात पाठीवर फिरवून तिच्या दुःखाकष्टांचें परिमार्जन करावें असें तिच्या आईच्या

मनानें घेतलें. बाळू तिला पोंचवायला अन् परत आणायला तयार होता; पण जयाच्या बापानें एकाच वाक्यानें तो बेत मोडून काढला. ' नाहीं. तें होणं नाहीं ! '

अशीं दोन वर्षे काळाच्या पोटांत विलीन झालीं. आई दुःखानें सुकली अन् खेदानें थकली. पुरुषजातीच्या निष्ठुरपणाला अंतरीं शिव्याशाप मोजीत तिनें आंथरूण धरलें. आतां मात्र वेळ अशी आली कीं, जयानें येऊन तिला भेटलेंच पाहिजे. त्यासाठीं कोणीतरी जाऊन तिच्या नवरोजींची काकुळती करणें जरूर होतें. पण जाणार कोण ? बाप पडला अभिमानाचा कांदा. तेव्हां ती कांहीं आशा नव्हतीच. बाळूनें ही परिस्थिति जाणली अन् तिच्या आईला म्हटलें, ' मी जाऊन येतों हवा तर ! '

" जा बाबा, घे एवढं पुण्य पदरांत. पोरगी एकदां भेटली कीं तिला अन् तुलासुद्धां भरल्या हृदयानें आशीर्वाद देऊन प्राण सोडीन मी. " जयाची आई म्हणाली अन् तिनें एक निसासा सोडला.

बाळूचें अंतःकरण कालवलें अन् त्याच दिवशीं तो जयाच्या गांवीं जायला निघाला. वाटेंत एका ठिकाणीं थोडा वेळ सांवलीचा आसरा घेऊन तिसऱ्या प्रहरीं तो शिरोलीच्या शिवेंत पोंचला.

आतां फक्त एक ठेंगणासा डोंगर चढून उतरायचा होता. पलीकडच्या पायथ्याशीं जवळच जयाचें घर आहे असें त्याला वाटेंत भेटलेल्या एका कुळवाड्यानें सांगितलें होतें. वळणावांकणांनीं गेलेली डोंगरावरची वाट अगदींच निरुंद नव्हती. बाळू जेव्हां टेकडीच्या माथ्यावर पोंचला तेव्हां त्याला उताराच्या बाजूनें एका भल्या थोरल्या पाणंदीचें मुख दिसलें.

तो चैत्राचा महिना होता. सूर्यानें आपले बहुतेक डोळे उघडून सृष्टीवर वटारले होते. बाळू सगळें ऊन डोक्यावर घेऊन आला होता. आणि आतां डोंगर चढल्यावर तर त्याचे ओठ सुकून आले होते. त्यानें एकवार सभोंवती नजर टाकली. काजूंचा ऐन बहर होता. तो सगळा डोंगर काजूंच्या झाडांनीं अन् सगळीं झाडें बोंडूंनीं भरलीं होतीं. वाऱ्यानें जराशी मुसंडी मारली तरी पिकून अळंग झालेले बोंडू देठापासून सुटून डोंगराच्या पाठीला शरण येत. त्यांतल्या कांहीं बोंडूंनीं बाळूच्या पायांचाहि आश्रय घेतला.

पण आपसुक पडलेलें फळ खाण्यापेक्षां तें स्वतः तोडून, पाडून खाण्यांत अधिक रस असतो. बाळूनें जवळचाच एक ‘ होंडका ’ उचलला अन् उताराच्या बाजूच्या एका पिवळ्या बोंडूच्या घडावर नेम धरून भिरकावला.

‘ खस्स् , सट्ट् , ढब्ब् ’ असे आवाज उठले अन् पडलेले बोंडू उचलण्यासाठीं बाळू उतरणार तोंच तिकडच्या बाजूनें हाकाटी कानांवर आली.

“ कोण आहे तिकडे ऽऽ ! मी आहे बरं का इथें ” हा हटकण्याचा आवाज बायकी आहे अन् ती व्यक्ति चोर धरण्यासाठीं झपाझप वर येत आहे असें बाळूला कळून आलें. एरव्हीं का एवढा वाळल्या पाचोळ्याचा ‘ चुरचुराट ’ झाला असता !

चोरा-मोराची दृष्टादृष्ट झाली मात्र; सगळीकडून एकदम अद्‌भुतरस पुंजाळला. ती जया होती अन् या वेळीं आपले काजू गोळा करायला ती डोंगरांत आली होती. तिच्या पाटुंगळीस सवतीची शेंबडी पोर गळ्याला विळखा घालून बसली होती. त्या चिमण्या जीवाचें ओझें संभाळून तिनें जो चढउतार केला होता तो ताकदीच्या जोरावर नव्हे; तर तितिक्षेच्या बळावर, हा आशय तिचें धपापतें ऊर बाळूला सांगत होतें. तिचे तोकडे अन् विरळ झालेले केस वाऱ्यावर भुरभुरत असलेले पाहून बाळूला वाटलें, केसांचा कोण केवा; हें चालतेंबोलतें ‘ शुष्क काष्ठ ’ उडवून लावायलासुद्धां वाऱ्याला फारसा जोर करावा लागणार नाहीं. जयानें सासरीं येऊन कांहीं कमावलें तर नाहींच; उलट असलेलें घालवलें मात्र, हें एकाच न्याहाळणींत बाळूला कळून चुकलें.

हातांतली बोंडूंनीं ओसंडणारी रोवळी खालीं आपटून जया म्हणाली,

“ बाळू ! केव्हां आलास रे ? ”

“ अग, हा आत्तांच येतों आहे. तहान लागली म्हणून एक बोंडू पाडायला गेलों तर तूं आलीस वाघणीसारखी गुरगुरून. ”

“ हं रे काय बाळू ! मला काय ठाऊक तूं आहेस म्हणून ? ”

हरपलें निधान गवसावें, तसा बाळूला पाहून तिला आनंद झाला, तिनें आई-वडिलांचा समाचार विचारला. त्यानेंहि ‘ सगळीं बरीं आहेत ’ असें तात्पुरतें उत्तर दिलें. कारण वस्तुस्थिति सांगायची ती वेळ नव्हती. ‘ चल आतां घरीं जाऊं ’ म्हणून ती पुढें झाली. बाळूनें मागून जातांना तिच्या

हातांतली ती भरलेली रोवळी काढून घेतली, तेव्हां जयाचे दोन्ही हात पाठीवरचें ओझें संभाळायला मोकळे झाले. बाळू त्या मुलीकडे पाहून म्हणाला,

" हें ' ओझ्यावर बिजं ' कशाला आणखी आणलंस तूं डोंगरांत ? स्वतःचा जीव तरी पेलतो का तुला ? "

" हे माझ्या अनंत जन्मींच्या कर्माचे भोग आहेत बाबा ! ही पोरगी घरीं राहात नाहीं. तिला डोंगरांत फिरायची गंमत वाटते. पण चालायची नाहीं एक पाऊलसुद्धां ! बापाची लाडकी अन् त्यामुळें माझ्या बोडक्यावर ही अशी रोज बसते. अन् न आणावी तर... ! "

बाळू बिचारा गप्पच राहिला. डोंगर उतरतांना जया मनांत म्हणत होती, ' बाळू अगदीं योग्य वेळीं आला. आज हे तालुक्याच्या बाजाराला गेले आहेत ते बहुधा अंधार पडायच्या आधीं घरीं येणार नाहींत. थोडा वेळ मोकळेपणें बाळूशीं बोलतां येईल. माहेरच्या कितीतरी गोष्टी विचारायच्या आहेत. '

घरीं आल्यावर तिनें पाठीवरचें ' जडजोखीम ' ओटीवर उतरून ठेवलें अन् ती आधीं सरळ पाटावर गेली. हातपाय धुवून जेव्हां तिनें गार पाण्याचे तोंडावर हबके मारले तेव्हां तिला जरा बरें वाटलें.

पडवीवर येऊन तिनें आधीं तिथें गोंधळ भरणाऱ्या बाकीच्या दोघां मुलांना अंगणांत पिटाळलें अन् सोप्यावर बाळूसाठीं शेंद्री पसरली.

" माझ्यासाठीं आतां विशेष कांहीं करूं नको बरं का. फक्त एक कपभर चहा दे म्हणजे झालं. " जया घरांत गेली अन् तिनें कपाळावर हात मारून घेतला. बाळूनें चहा मागितला होता अन् तिथेंच तिच्या वर्मावर घाव बसला होता. घरांत चहा-साखर नव्हती का ? होती; पण ती नवऱ्याच्या खासगींतल्या फडताळांत अन् त्याची किल्ली त्याच्या जानव्यांत. आपल्या या असमर्थतेमुळें तिला गहिंवरून आलें.

आणि मग तिला आठवलें कीं चार दिवसांपूर्वीं एक फणस काढून खोलींत ठेवून दिलेला आहे. ती लगबगीनें खोलींत गेली. फणसावर टिचकी मारतांच त्यानें ' डब्ब् ' आवाज करून आपण पिकल्याचें तिला सांगितलें.

तो फणस अन् कडाशीची कोयती घेऊन ती बाहेर आली. ' बाळू, चल गरे खायला. या हंगामांतला पहिलाच फणस आहे हा.' तिनें म्हटलें. बाळू

फणसाच्या जवळ जाऊन बसला. तो गरे खात होता अन् ती शेंडे काढून देत होती. फणसाविच्छेदन करणाऱ्या जयाच्या हाताचें तें सहावें बोट पाहून बाळूला वाटलें कीं, तेंही जर जयाच्या बाळपणीं कापून टाकलें गेलें असतें तर किती चांगलें झालें असतें ! तिला या अंधाऱ्या कैंबळी घरांत जन्मठेप भोगावी लागली नसती.

गरे खाऊन बाळूचें पोट भरलें; पण गोष्टी विचारून अन् ऐकून जयाचें कांहीं पोट भरेना. बाळूच्या रूपानें जणूं माहेरचा विश्वकोश तिच्यापुढें उभा झाला होता. माहेर अन् ती स्वतः यांच्यामधलें दोन वर्षांचें खिंडार ती एका घटकेंत भरून काढूं पाहात होती. बाळू दिसला तेव्हांच तिनें मनाशीं निश्चय केला होता कीं आपली कर्मकहाणी त्याला कळूं द्यायची नाहीं. मर्मावरचे घाव त्याला दिसूं द्यायचे नाहींत. पण बोलतां बोलतां आपल्या हृदयावरचें झांकण केव्हां उघडलें तें तिचें तिलाच कळलें नाहीं. निग्रहाचे बांध फोडून तिची करुण वाणी वाहूं लागली. आपल्या वैवाहिक जीवनाचा ' वार्तापट ' अश्रूंनीं ओला करून तिनें तो बाळूसमोर खोलला.

त्या घरांत ती गृहिणी नव्हती; तर एक पोतेरें होती. नवऱ्याची ती भार्या नव्हती; तर खेटरखाऊ बटीक होती. घरांत एका काडीवरसुद्धां तिची सत्ता नव्हती. तिच्या आशा-आकांक्षा जाळायला तो सदैव चुडणी पटवून उभा होता. तिच्या भावनांवर नेहमीं त्याच्या डाव्या पायाची टांच होती. तुकोबांच्या गाथ्यांतून एकच अभंगचरण तो शिकला होता कीं, ' पायींची वहाण पायीं बरी ! ' त्याच्या गैरहजेरींत घरीं येणारा गांवांतला कोणीहि ' पुरुष ' तिनें मथवूनच आणला असला पाहिजे असाच त्याचा तर्क धांवायचा. शेजारघरीं पाय देण्याची तिला सक्त बंदी होती. तें घर त्यानें तिच्या वांट्याला ' काळें-पाणी ' करून ठेवलें होतें.

बाळूनें तें सगळें ऐकलें. ऐकूनच त्याला तें असह्य झालें. तो म्हणाला,

" जया, अशानं कसं होणार तुझं ? स्वत्वाची जाणीव ठेवून तूं प्रतिकाराला उभं राहिलं पाहिजेस. तूं शेळपट बनली आहेस म्हणूनच तुझा नवरा शेफारला आहे. "

" काय करूं मी ! मारतात रे मला ! अगदीं गुरासारखं झोडपतात. जिवाची भीति असते ना माणसाला — "

" असलं जिणं जन्माचं पदरीं बांधून घेण्यापेक्षां मेलेलं काय वाईट -- ? " बाळूच्या तोंडून भावनेच्या आवेगासरशीं हे शब्द बाहेर पडले खरे; पण मग त्याला वाटलें कीं, आपण चुकलों. पण जयाला त्याचें कांहींच वाटलें नाहीं. ती म्हणाली,

" अगदीं माझ्या काळजांतलं बोललास. मलाहि आतां असंच वाटूं लागलं आहे. "

" म्हणजे जीवबिव देणार आहेस कीं काय ? माझ्या बोलण्याचा भलताच अर्थ नको करूं. "

" जीव द्यायलाच कशाला हवा ? कोणी घेतला तरीहि तो जाऊं शकतो. तिळातिळानं झिजवून मारताहेत हे मला. जें काय व्हायचं तें होणारच आहे कधींतरी. मग त्याला आतांपासूनच सामोरं झालेलं काय वाईट ? आज तूं आलास; बरं वाटलं. तुझ्या ध्यास लागला होता मला. तो आज पुरा झाला. आतां फक्त आईची एकदां भेट झाली कीं -- "

" मीं तुला न्यायालाच आलों आहें जया. तुझी आई आजारी आहे. तिचं अन्नपाणी तुटलं आहे. सारखी तुझ्या नांवाची जपमाळ ओढीत ती पडली आहे. "

तें ऐकून जयाला अनावर हुंदका आला. आईची कृश मूर्ति तिच्या डोळ्यांसमोर उभी राहिली. तिला आईचे बोल आठवले, माया आठवली, सगळेंच कांहीं आठवलें. डोळ्यांतलें दुःख गालांवरून वाहूं लागलें. मुखमुद्रा कोमेजली. तिला वाटलें कीं मैनेचे पंख लावून भुर्रदिशीं माहेर गांठावें अन् घटकाभर आईच्या कुशींत बिलगून, तिच्या ओठाचा ठसा आपल्या गालांवर मिरवीत नवरा बाजाराहून येण्याच्या आंत घरीं परत यावें.

पण तिच्या मनांतलें हें वाक्य पुरें व्हायच्या आंतच नवरा पडवीवर येऊन उभा राहिला. कुठूनहि यायचें झालें म्हणजे मांजराच्या पावलांनीं तो ओटीवर चढत असे. डिटेक्टिव्ह ' रामराव ' आणि ' घाशीराम ' अशा दोन्ही भूमिका तो एकटाच करीत होता.

मावळतीच्या सूर्याचीं उन्हें आतां झाडांच्या शेंड्यावर चढलीं होतीं. पाटाखालच्या भरगच्च कुळागरांत कृष्ण छाया सांकळूं लागल्या होत्या. तो

बाहेरून आल्यावर यावेळीं पाटाच्या पाण्याच्या दुडी भरून ओल्या अंगानें जया मेरेखालचीं मिरच्यांचीं झाडें शिंपीत असलेली त्याला दिसायला हवी होती. पण ती तर आरामशीर बसली होती, आसवं गाळीत होती अन् तिच्या जवळच एक अनोळखी तरुण मांडी ठोकून बसला होता.

त्यानें आपला ओठ दांतांखालीं दाबला. हत्तीचे डोळे शक्य तेवढे मोठे केले. आणि त्याला आढळून आलें कीं घरांतला फणसहि फस्त झालेला आहे.

त्याच्या अकल्पित आगमनानें जया भेदरली. चट्कन उठून आठळ्या, चारखंडें आवरूं लागली. त्याला वाटलें, ‘ कसं पकडलं चोरटीला ! ’ कडाडतच तो पुढें आला.

“ कोणाच्या परवानगीनं फणस फोडलास ? उद्यां वाण्याला दिला असता तर बंदा रुपया आला असता त्याचा. कोण नुकसान भरून देणार हें ? तुझा बापुस ? ”

या सरबत्तीनें बाळू चमकला अन् माहेरच्या माणसाच्यादेखत नवऱ्यानें आपला अपमान करावा, हें शल्य जयाच्या उरीं खोंचलें. नवऱ्याच्या डोळ्याला डोळा देऊन ती म्हणाली,

“ मग काय करायचं ? उन्हातान्हांतून तो आलेला. कपभर चहा देईन म्हटलं तर सगळं तुमच्या कुलपांत. ”

“ कोण हा एवढा ‘ सोमाजी सकळकळ्या ’ ? काय याचा आपला संबंध ? शरम नाहीं वाटली त्याच्या शेजारी फतकल मारून ‘ गुजुगुजु ’ करायला ? ”

“ शरम कसली वाटायची त्यांत ? तो माझ्या माहेरचा आहे—”

“ माहेरचा ? असं काय—”

बाळूला वाटलें कीं, घरीं आलेल्या अभ्यागताबद्दल साधा शिष्टाचार-सुद्धां न पाळतां संशयाचें विष ओकणाऱ्या या हलकट माणसाला आडवा घालून चांगला तिंबून काढावा. पण त्याला सभ्यता होती. कमरेचें सोडून माथ्याला गुंडाळलें नव्हतें त्यानें. आणि कसाहि सुष्ट दुष्ट असला तरी त्याचा संबंध जयाच्या सौभाग्याशीं पोंचत होता.

गऱ्यांनीं चिकट झालेले हात धुवायला म्हणून बाळू पाटावर गेला अन् जया घरांत गेली. तिला आज नवऱ्याला फार भडकूं द्यायचें नव्हतें. शक्य तेवढे प्रार्थनामंत्र म्हणून तिला त्याच्याकडून माहेरीं जायची परवानगी मिळवायची होती. अपमान अन् तिरस्कार हे तर तिचे नित्यभोगच होते. दोन दिवस तरी त्यांतून सुटका होते कीं काय, तें ती आज पहाणार होती.

दिवेलागणी झाल्यावर तिनें चूल पेटवली. कुळथांची पिठी अन् अळवाच्या माडीचे काप तळून तिनें दोघांनाहि सुग्रास जेवायला वाढलें. तिनें बाळूला आग्रह केलेला नवऱ्याला आवडला नाहीं. घुमेपणानेंच तो गिळून उठला. बाळूचें अस्तित्व त्याच्या पोटांत सारखें ढवळत होतें. बाळू आंचवून बाहेरच बसला अन् तो परत घरांत आला. स्वयंपाकघरांत जया आपलें पान वाढून घेत होती, तिला त्यानें विचारलें,

" कशाला आला आहे हा ? अन् किती दिवस रहाणार आहे ? "

" मला न्यायला आला आहे तो. आईनं पाठवलं आहे त्याला. "

" मग त्याला सांग कीं, सकाळीं वाट धर आपली. मी तुला पाठवणार नाहीं. "

" असं काय बरं ? मी आठ दिवस जाऊन येतें ना. निदान चार दिवस तरी—" जयानें काकुळती केली.

" तूं माहेरीं जायचंस अन् इथल्या काजू कोणी गोळा करायच्या ? "

" कामं का कधीं संपलीं आहेत ? पण प्रसंग पहायला हवा. माझी आई फार आजारी आहे. "

" आई गेली मसणांत ! "

त्यावेळीं हे शब्द त्यानें नको होते उच्चारायला. तिची आई आजारी होती अन् तिला बरं वाटावं म्हणून जया मनांतल्या मनांत देवाला नवस बोलत होती. अन् त्यांत नवऱ्याची ही अभद्र वाणी. तिच्या मस्तकांत 'सण्ण' झालें. उकरून घेतलेल्या भाताची तपेली हातांत होती ती जमिनीवर आदळून ती उफाळली.

" मसणांत सगळींच जाणार आहेत. आई, वडील, मी अन् तुम्हीसुद्धां ! "

त्याच क्षणीं जयाच्या श्रीमुखांत बसलेली चपराक बाळूला पडवीवर ऐकायला आली अन् पाठोपाठ तिचे तिखयाच्या धारेचे शब्दहि.

“ तुमचं हें ‘ मारबडव ’ आज उपयोगी पडायचं नाहीं. मी माहेरीं जाणार. निक्षून सांगतें कीं, जाणार ! ”

“ पहातों कशी जातेस ती. तंगडी मोडून ठेवीन. ”

“ तंगडी मोडलीत तर बाळूच्या पाठुंगळीस बसून जाईन.”

“ इथपर्यंत मजल गेली का ? बाळू कोण तुझा ××× ? ”

“ काय म्हणालांत ? ते शब्द परत घ्या अन् चूल भरून टाका आधीं—”

“ मला दम भरतेस ? त्या बाळ्याच्या जिवावर एवढी माजलीस होय ? ” असें म्हणून पुन्हां त्यानें एक दणका हाणला.

जयाच्या डोळ्यापुढें अंधारी आली. पडता देह तिनें महाप्रयासानें सांवरून धरला. पण त्या दोन प्रहारांनीं तिच्या निश्चयाचा खांब अधिकच बळकट झाला. तिनें विझवून ठेवलेलें चुलीजवळचें एक लांकूड उचलून नवऱ्याच्या पुढें केलें.

“ हें घ्या. यानं काम चांगलं होईल. मला जाऊं द्यायचं नसेल तर माझा जीवच बाहेर काढला पाहिजे तुम्हांला. दुसरा मार्ग नाहीं ! ”

आतां मात्र नवरा हतबुद्ध झाला. तें लांकूड घ्यायला त्याच्या हातानें नकार दिला. हरणाच्या काळजानें आपल्या घरांत वावरणारी ही आपली बायकोच का, अशा दृष्टीनें तो तिच्याकडे पाहातच राहिला. जिवावर उदार झालेल्याला मारतां येत नाहीं हा नवाच अनुभव त्या रात्रीं त्याला घडत होता. यापुढें तिला आणखी एक चपराक लगावणें म्हणजे तें स्वतःच्याच थोबाडींत मारून घेण्यासारखें होतें. आतां काय करावें, अशा भ्रांत मूढ अवस्थेंत तो पिचपिचूं लागला.

वाढून घेतलेल्या पानांतला एकहि ग्रास न उष्टावतां जया हात धुवून माजघरांत आली अन् तिनें दांडीवरचें चोळीलुगडें ओढलें. नवऱ्याची खात्री झाली कीं, बायको उद्यां नव्हे, तर आतांच निघाली. किंचित्काळ मूर्च्छित झालेली त्याची तामस वृत्ति ‘ हुमले ’ चावल्यागत तिडमिडून उठली. त्यानें झटकन् पुढें होऊन तिचा हात पकडला.

“ सोडा मला. ” जया भुवयांची करडी कमान करून बोलली. पण नवऱ्याची पकड ढिली झाली नाहीं. तिनें बसकण घेतली. तो तिला फरफटवूं

लागला. खोलीच्या दारापर्यंत त्यानें तिला ओढीत आणलें, दोन्ही हातांनीं तिचें मोटळें खोलींत लोटून दिलें अन् बाहेरून कडी लावून घेतली. ‘ मर आतां तिथें ! ’

पण कोंडली गेलेली ती जया नव्हती; तर जखमी झालेली वाघीण होती. क्षणभर तिला वाटलें कीं आपल्या सगळ्या अवसानावर पाणी पडलें. तिला सुटकेचा कसलाच उपाय गवसेना. ती दिङ्मूढ झाली. पण जागा झालेला तिचा अंतर्यामी तिला म्हणाला, ‘ नाहीं. असं कोंडून राहायचं नाहीं. ’ दारावर दोन धडका देऊन तिनें नवऱ्याला म्हटलें, ‘ दार उघडा ! ’

“ मी माहेरीं जाणार नाहीं असं कबूल कर. चुकलें म्हणून क्षमा माग. मग पाहीन. ”

“ यापैकीं मी कांहींच करणार नाहीं. पण तुम्हांला दार मात्र उघडावं लागेल. इथें रॉकेलची चिमणी आहे. तिच्या शेजारची काड्यांची पेटी पण माझ्या हाताला लागली आहे— ”

“ मग काय, लुगडं पेटवून स्वतःला जाळून घेणार आहेस का ? अवश्य घे. मी ‘ अपसव्य ’करून तयार आहें इथें... ”

जया त्यावर कोरडें हंसून म्हणाली,

“ कल्पना चुकली तुमची. मी स्वतःला जाळून घेणार नाहीं; तुमचं घर जाळणार आहें. तुमची सगळी ‘ माया ’, जमिनीचे कागदपत्र, सगळं या इथल्या पेटींत आहे, लक्षांत आहे ना ? ” जयानें त्या लाकडी पेटीवर हात मारून आवाज काढला.

तिनें नवऱ्याच्या काळजालाच हात घातला होता. ती त्याच्या सर्वस्वावर उठली होती. पण तरीहि त्याने थोडा वेळ दम खाल्ला. दोनचार हांका मारूनहि तो हालचाल करीत नाहीं असें समजतांच जयानें पुढचा पवित्रा टाकला. तिनें काडी मारल्याचा आवाज त्याच्या कानांत शिरला. दिव्याचा प्रकाशहि दाराच्या फटींतून बाहेर डोकावला.

“ आतां शेवटचं विचारतें. दार उघडतां का नाहीं ? मी चिमणीचा हात सरळ उभा करायचा अवकाश आहे ! पुढचं तुम्हांला सांगायला नकोच ! ”

नवऱ्यानें एकदां छपराकडे नजर टाकली. तो पोफळीच्या चुडतांचा ‘ केंबळा ’ उन्हानें वाळून वाळून ज्वालाग्राही बनला होता. एकदां आग भिडली कीं कोणाच्या बापाला ती आटोक्यांत येणार नव्हती. दुसऱ्या दिवशीं तीन पोरांना घेऊन त्याला राखेच्या ढिगावर बसावें लागलें असतें. त्या कल्पनेनें त्याचे हातपाय लटलटले.

“ माझे बये, तसलं कांहीं करूं नको. मी दार उघडतों. ” हे शब्द अन् पाठोपाठ कडी खळकन् खालीं पडली.

जया नागिणीसारखी सळसळत पडवीवर आली. बाळू तिथें खांबलीला टेकून उभा होता. अगतिक होऊन जें घडतें तें डोळ्यांनीं पाहात होता अन् कानांनीं ऐकत होता.

“ बाळू ! चल नीघ माझ्याबरोबर ! ”

“ अशा चढत्या रात्रीं—?”

“ होय. ज्या क्षणीं मी जुलमांतून मुक्त झालें तोच माझा अमृतसिद्धीचा मुहूर्त. आतां इथें एक पळभरसुद्धां राहायचं नाहीं. ”

अंगणांत पाऊल ठेवतांना जया नवऱ्याकडे वळून म्हणाली,

“ या घरीं मी पुनश्च यावं असं वाटत असेल तर आधीं ‘ माणूस ’ व्हा अन् मग मला न्यायला या. ”

त्या वेळीं प्रहर रात्रीचा सुमार झाला होता. गांवांतलीं माणसेंच नव्हे तर गुरेंढोरेंसुद्धां झोपलीं होतीं. पश्चिमेला आकाशांत एका मेघखंडानें चंद्राचें तोंड काळें केलें होतें अन् आर्द्रेची तारा त्याच्याजवळून दूर दूर सरकत होती. आणि ज्या काजूच्या झाडांनीं आजच दुपारीं त्या दोघांना हंसत खेळत डोंगर उतरतांना पाहिलें होतें त्यांनाच अशा भयाण रात्रीं तीं दोघें पाळंदीच्या मुखांतून डोंगरमाथ्यावर चढतांनाहि पहावें लागलें होतें.



# अंतरींच्या कळा ५

त्या लहानशा गांवांत मी जेव्हां पोंचलों तेव्हां सकाळचे नऊ वाजले होते. ज्या एका सुपरिचित मित्राच्या भेटीसाठीं म्हणून मी गेलों होतों तो सुदैवानें घरीं होता. मी अचानक आलेला पाहून त्याला जो हर्ष झाला होता तो त्याच्या संभ्रमावरून कळून येत होता. आधीं रसाळ गरे अन् वर भिरंडाचं गुलाबी पन्हं देऊन त्यानं माझं आतिथ्य केलं. नंतर माझ्याबरोबरच आपणहि तंबाखूचा बार भरून तो मला म्हणाला,

" शास्त्रीबुवा, आमच्या एका ग्रामस्थाच्या घरीं आज मुंज आहे. मला आतां तिकडं गेलं पाहिजे. तुम्ही पण चला माझ्याबरोबर. कुशाभाऊला खूप आनंद होईल तुमच्या येण्यानं. "

" छेः हो ! मी कशाला ? माझी ओळख ना देख ! उगाच अनोळखी ठिकाणीं जायचं म्हणजे कसंसंच वाटतं. तुम्ही चला. मी राहातों घरीं. "

" अं, हं ऽ ! असं कधीं झालंय ? परकी पाहुणा म्हणजे आम्हांला इकडे जिवाआगळा वाटतो. आमचं घरदार त्याच्या सेवेला सादर होतं. तुम्ही जर आलां नाहींत तर थोड्याच वेळांत काय चमत्कार होतो तो पहाल. "

आणि झालं खरं तसंच. माझा मित्र निघून गेला अन् पंधराच मिनिटांत कुशाभाऊची स्वारी तिथें हजर झाली. आणि त्यांच्यासोबत त्यांचा उपाध्या.

" शास्त्रीबुवा, मी तुम्हांला बोलवायला आलों आहे. योगायोगानं तुम्ही आमच्या गांवीं आज नेमके पोंचलांत; तेव्हां आतां आजचा दिवस आमच्याकडे मुक्काम. माझ्या घरचं हें पहिल-वहिलं कार्य. मुलाच्या मस्तकावर तुमच्या हातून चार मंत्राक्षता पडूं देत. "

जणूं त्याचा माझा जन्मजन्मांतरींचा स्नेह आहे अशा भावनेच्या भाषेंत तो बोलत होता. त्या आनंदाच्या प्रसंगीं त्याचं मन हळवं झालं आहे हें मला कळून चुकलं आणि तें आदराचं आमंत्रण मी निमूटपणें स्वीकारलं.

स्नान अन् आन्हिक आटपून तिथें पोंचतों तों मुहूर्ताची वेळ झाली होती. पिता–पुत्रांमध्यें अंतरपाट धरून भटजींनीं मंगलाष्टकं सुरू केलीं होतीं. पंचक्रोशींतली स्त्री पुरुष मंडळी तिथें जमली होती: अन् ' कुर्यात् बटो-र्मंगलम् ' हें पालुपद आलं कीं बटूवर अक्षतांचा पाऊस पडत होता.

बसल्या बसल्या माझी नजर त्या आसमंतावर फिरली. कौलारु बैठं घर अन् पुढच्या अंगणांत घातलेला तो प्रशस्त मांडव. माडाच्या चुडतांनीं तो आच्छादला होता. दुपारच्या वेळीं ' नक्षत्र ' तापलं तरी त्याचा कवडसाहि आंत येऊं नये म्हणून त्यावर आणखी पाकडाचं गवत पसरलं होतं. त्या समतळ जागेत घराच्या सर्व बाजूंनीं ज्या केळी-पोफळी मांडल्या होत्या अन् बारके बारके पन्हळ लावून घराभोंवतीं जें पाणी खेळवलें होतें त्यामुळें तिथें रमणीयता अन् शीतलता यांचा प्रीतिसंगमच घडला होता.

समोरच्या अशोकाला तुरेच तुरे आले होते. त्याच्या शेजारचा फणस आपादमस्तक लहानमोठया फळांनीं लगटला होता. पाटाच्या एका बाजूनें तगरी फुलून नववधूसारख्या नटल्या होत्या. दुसऱ्या बाजूला हारीनें उभ्या असलेल्या लिंबिणींना हिरव्या पिवळ्या लिंबांचे घड पेलत नव्हते. आणि ती उभ्या लांब पकळ्यांवर किरमिजी रेषा खुलवणारीं भुईचांफीं–मला वाटलें, मी दैववशात् एखाद्या तपोवनांत तर आलों नाहीं ना ? ही मुंज एखाद्या ऋषिकुमाराची तर नव्हे ? खरोखर कुशाभाऊच्या घरीं सुखाची किती लयलूट असली पाहिजे !

इतक्यांत ' वाजवा रे वाजवा ' ची घोषणा उठली. भटजींच्या सांगण्या-वरून कुशाभाऊनं मुलाला मांडीवर घेतलं. एवढा वेळ मुलगा मला पाठ-मोरा होता तो आतां सन्मुख झाला. त्याच्यावर टाकलेल्या पहिल्याच दृष्टिक्षेपांत माझी धारणा झाली कीं मुलगा कांहींतरी निराळाच आहे. त्याची अंगलट बऱ्यापैकीं होती. आठ वर्षांच्या मानानें उंचीहि कमी नव्हती. गालांचा फुगीरपणा अजून पुरता ओसरला नव्हता. जितकी हनुवटी निमुळती तितकंच कपाळ रुंद होतं. एकंदरींत गोजिरवाणं मूल म्हणून कोणीहि त्याचं तोंड कुरवाळलं असतं.

पण त्याचं सगळं निराळेपण होतं तें त्याच्या डोळ्यांत. ते त्याच्या मुख-मंडलाला साजेसे होते तरी त्यांत कडवटपणाची झांक होती आणि त्याचं तें

उंच नाकहि त्या कटु भावनेला साथच करीत होतं. या निरागस बालब्रह्मांत हा कडवटपणा कां शिरला असावा तें मला समजेना. मी कुशाभाऊकडे पाहिलं, बापलेकांच्या अंगठशांत अन् चर्येतसुद्धां साम्य नव्हतं. मी म्हटलं, ' मुलगा मातृमुखी असावा. '

आणि मग माझी दृष्टि त्याच्या आईला शोधूं लागली. मंगल कार्यांत शेकडों सुवासिनींतून यजमानीणबाई नेमकी हुडकून काढतां येते. तें ठेवणींतलं लुगडं, ते असतील नसतील तेवढे सगळे दागिने, तें वाढून मोठं झालेलं कपाळाचं कुंकूं, हिच्याशीं एक शब्द, तिच्याशीं एक वाक्य असा गोड संभ्रम अन् हंसतमुखानं चाललेली ती धावपळ—पण अशा वर्णनाची बाई मला त्या स्त्रीसमुदायांत दिसेना.

पण मग लगेच आठवलं. ती असेलच कशी या वेळीं मांडवांत ? मुलाच्या मस्तकावर पडणाऱ्या मंगलाक्षता तिनं पहायच्या नसतात ना ?

मांडवांत ब्राह्मण एका सुरांत मंत्र म्हणत होते. कुशाभाऊची तंद्री लागली होती. मंत्रांतलं प्रत्येक अक्षर म्हणजे मुलाला आयुष्य, ज्ञान आणि बळ देणारं रसायन आहे या श्रद्धेनें त्याची श्रवणभक्ति चालली होती. मुलगा त्याच्या मांडीवर बसला होता खरा; पण किती चोरटं चोरटं अन् अलिप्त होतं तें बसणं ! माळावरच्या खडकावर अणकुचीदार ' कोचं ' उगवतात ना, त्यांच्यावर बसल्यासारखं. आणि त्याचं लक्ष गुंतलं होतं ते समोरच्या अशोकाखालीं बसलेल्या दोन व्यक्तींकडे.

सुपं-रोवळ्या घेऊन आलेली, एक महारीण तिथें टेकली होती. अडीच तीन वर्षांचं तिचं पोर तिच्याशीं लडिवाळी करीत होतं. मध्येंच तिच्या झिंज्या ओढींत होतं. लगेच तिच्या गळां मिठी घालीत होतं. घटकेंत आपले पुटं चढलेले गाल तिच्या ओठांवर टेकीत होतं. तिनं दटावलं कीं त्याला अधिकच स्फुरण भरत होतं आणि त्या पोराचा खोडकरपणा अन् त्या माउलीची ती स्निग्ध दृष्टि पहातांना मुंज्या मुलाचीं नेत्रदळं विकसलीं होतीं. वारंवार त्याच्या गालाला खळ्या पडत होत्या. तो जणूं बोहल्यावर नव्हताच !

बापाच्या मांडीवरून पाटावर बसतांच त्याला हायसं वाटलं. नंतर उपाध्यानीं स्थंडिलावर अग्नि प्रज्वलित केला. ' बघून घ्या हो सर्व मंडळीऽऽ ! ' म्हणून त्याला पिवळी लंगोटी नेसवली. तिपेडी दर्भमेखला कमरेला बांधून

वर पिवळा पंचा लपेटला. गळ्यांत जानवं अन् मृगाजिनाचा तुकडा अडकवून हातीं दंडकाष्ठ दिलं. कुशाभाऊनं त्याच्या कानांत गायत्री उपदेशली. आणि एवढं झाल्यावर उपाध्येबुवांनीं त्याला माझ्यापुढें आणलं. मला दंडप्रणाम करायला लावून ते म्हणाले,

" शास्त्रीबुवा, बटु दीक्षा घेण्यासाठीं आपल्याकडे आला आहे. त्याला ब्रह्मचाऱ्याचे धर्म आपण सांगावे. "

मी सन्मान्य पाहुणा म्हणून आलों होतों अन् शिवाय वे. शा. सं. होतों. अर्थात हा अधिकार माझ्याकडे येणं क्रमप्राप्त होतं.

आठ वर्षांचा तो अबोध बालक डोळ्यांचीं कवाडं शक्य तेवढीं खोलून मजकडे पहात होता. गुलाबी पगडी, पेशवाई आंगरखा अन् वर नागपुरी उपरणं या माझ्या वेषानं त्याच्या मनांत थोडासा वचक निर्माण झाला असावा. मीहि तितक्याच जिव्हाळ्यानं त्याला न्याहाळीत होतों. त्या बटुवेषानं नटलेलं तें बाळध्यान मला कमालीचं मोहक वाटलं. मी मनांत म्हटलं ' काजळाचं ओझरतं गालबोट लावून याला याच्या आईनं मांडवांत पाठवलं आहे म्हणून ठीक; नाहीं तर माझीच दृष्ट लागली असती याला ! '

मुंजीच्या प्रयोगांत उपदेशाच्या म्हणून ज्या पंक्ति दिलेल्या आहेत त्यांतली एकेक उच्चारून मी त्याला सांगूं लागलों.

" बाळ, आजपासून तूं ब्रह्मचारी झालास. आतां रोज दोन्ही वेळां संध्या करायची. अग्नीची उपासना करायची. समजलं ना ? "

त्यानं संमतिदर्शक मान हालवली. त्याबरोबर त्याच्या हातांतलं दंडकाष्ठहि हाललं. माझ्या उपदेशाकडे त्याचें लक्ष आहे हें पाहून मला समाधान वाटलं. तोच नव्हे; तर आवतींभोंवतीची इतर मंडळीहि गप्पाटप्पा थांबवून माझ्याकडे पाहूं लागली होती. मधल्या खांबाजवळ एकमेकींना अबोलीच्या वेण्या माळणाऱ्या पुरंध्रींनींहि कलरव थांबवला होता. कुशाभाऊचा अंतरात्मा तर फुलून गेला होता.

इतक्यांत गळ्याला ' रोडमाणकं ' आलेलं एक वासरूं दक्षिणेकडच्या दारानं मांडवांत शिरूं लागलं. कोणीतरी त्याला हांकलण्यासाठीं लाकूड उगारलं. त्यावर एक मुलगी अजीजीच्या स्वरांत म्हणाली. ' ए, नको रे त्याला मारूं. आईवेगळं पोरं पोरटं आहे, तें—'

मधेंच आलेलं हें आडमेळं दूर झाल्यावर मी पुन्हां सुरू केलं—"आणि हें पहा, आतां खेळणं बागडणं कमी करायचं अन् मन लावून विद्या शिकायची. त्यासाठीं माधुकरी मागायला पाहिजे. ' ओम् भवती, ' समजलं ना? प्रथम कोणाकडे मागायची? तर जें माणूस आपल्याला ' नाहीं ' म्हणणार नाहीं त्याच्याकडे. असं कोण आहे सांग बरं? दुसरं कोण असणार? आपली आई. ' आदौ मातरम्...'

" पण मला आई आहे कुठं? ती गेली देवाच्या घरीं—"

त्या बटूनं माझ्या वक्तृत्वाच्या प्रवाहाला एकदम खटका दिला. हें मीं कांहीं तरी नवीनच ऐकत होतों. त्यामुळें माझ्या वृत्तींना एकदम स्तंभ आला. मी बोलून चालून परका. मला काय कल्पना या अदृष्टाची! अजाणतां मी त्या बटूच्या मर्मतंतूला धक्का लावला होता. पण अजाणतां घडली तरी चूक ती चूकच. मला तिचा चटका बसायचा तो बसलाच. मीं सभोंवतीं दृष्टि टाकली. पुरुषांच्या मुद्रेवर गांभीर्य पसरलं होतं. बायकांचे पदर डोळ्यांकडे गेले होते अन् बोहल्यावर शाल पांघरून बसलेला तो कुशाभाऊ! चैत्र महिन्यांत तुळशीच्या मुळांत गळती लावावी तसे त्याचे नेत्र ठिबकत होते. त्यामुळें माझाहि गळा दाटून आला. एकवार घसा साफ करून मी म्हणालों,

"—बाळ, मला तुझी करुणा येते. एक फार मोठं सुख तूं गमावून बसलास. तुझ्यासारख्या गोड मुलाला जन्म देणारी माता किती गुणवंती असेल नाहीं? तुझं नशीब! आतां आईच्या जागीं बापाला मान. तुझे वडील मनाचे मवाळ आहेत. ते तुझीं सगळीं कौतुकं पुरवतील. ' अथवा पितरम्-'

पण हेंहि वाक्य मला त्यानं पुरं करूं दिलं नाहीं. एकदम न पटल्यासारखं दाखवून तो म्हणाला,

" त्या दिवशीं मी सकाळच्या आटवलावर मेतकूट मागितलं तर दादा नाहीं म्हणाले."

आतां या पोराला काय सांगायचं? माझे शब्द तो वाच्यार्थानें घेत होता. ध्वन्यर्थाचे छक्केपंजे अजून त्याला ठाऊक नव्हते. त्याची बुद्धि बाल होती म्हणूनच धोपटमार्गी होती. अशा व्यक्तींच्या पुढें तर्क पांगुळतात, व्याख्यानं लटकीं पडतात हा अनुभव कांहीं आजचाच नव्हे. त्या बटूच्या रोखठोक

उत्तरानं मांडवांत एक हास्याची लकेर उठली. पण माझं लक्ष होतं तें कुशाभाऊकडे. तो बिचारा एका डोळ्यानं हंसत होता अन् दुसऱ्या डोळ्यानं रडत होता.

मी तो उपदेशाचा प्रसंग पुढें दोन वाक्यांत आवरता घेतला अन् बटूला पुढच्या कार्यासाठीं पाठवून दिलं. मुंजीचा विधि पुरा झाला. जेवणावळीहि उरकल्या. नातलग मंडळींखेरीज बाकीचे लोक हळूहळू ओसरले. कुशाभाऊला थोडी स्वस्थता मिळतांच तो चंची घेऊन माझ्याकडेच आला. मी जरा आडवा पडलों होतों तो उठून बसलों. त्यानं माझ्याशीं बोलायला सुरवात केली तीच मुळीं अशी—

" शास्त्रीबुवा, सकाळीं उपदेशाच्या वेळीं मधूनं तुमच्याशीं थोडी धिटाई केली त्याबद्दल राग धरूं नका."

" छेः छेः ! हें काय भलतंच बोलणं ! मलासुद्धां मुलं आहेत कुशाभाऊ. मुलांवर उठल्या सुटल्या रागावण्यापेक्षां त्यांच्या प्रवृत्तीचं मूळ समजून घ्यावं. त्यांच्या अंतरांत खोल शिरण्याचा प्रयत्न करावा. मुलं दिसतात तितकीं उथळ नसतात बरं ! "

" तें आम्हांला काय कळायचं खेडवळ माणसांना ? पण तो बोलला तें मात्र सत्य होतं. एक दिवस माझ्याकडे त्यानं मेतकुटाचा हट्ट धरला होता; पण मेतकुट ही काय बाजारांत मिळण्याची वस्तु आहे ? निदान आमच्याकडे तरी मिळत नाहीं. मेतकुट कसं बनवतात हें मला मुळींच ठाऊक नाहीं. मी आपला आमटीभात अन् घरांत असेल तें दूधदुभतं त्याला वाढतों—"

कुशाभाऊ एकदम थांबला. त्यानं एक दीर्घ श्वास वर खेचून घेतला. पत्नीविरहाचं दुःख त्याच्या हृदयांत कांठोकांठ भरून आलं होतं. पण तें एकरस नव्हतं. वात्सल्याच्या वेदनाहि त्यांत मिसळल्या होत्या.

" काय सांगूं तुम्हांला ? ही गेल्यापासून पोरगा असा विचित्र बनला आहे. त्याला कसं प्रसन्न ठेवावं हेंच मला कळत नाहीं. गेलीं दोन वर्षं मी या विवंचनेंत आहे. त्याच्यासाठीं मी जीव आटवतों. त्याचा हट्ट बहुधा पुरा करतों. पण तें त्याच्या खिसगणतींतहि नाहीं. भूक लागली म्हणायचं; पण पान वाढलं तरी घरांत यायचंच नाहीं. बळें बळें आणून बसवला तर पानांतलीं शितं चिवडीत राहायचं. मग मला वाटतं कीं पोराला दह्यादुधाचे चार घास

भरवावेत. पण मी घास पुढें केला कीं माझ्या हाताकडे बघत राहातो, अन् मग कांहीं केल्या त्याची दांतखीळच उघडत नाहीं. अशावेळीं मला विवेक राहात नाहीं. माझे हात त्याच्या पाठींत दणके घालूं लागतात. त्या वेळीं माझी अपेक्षा असते ती ही कीं पोरानं रडावं, 'मारूं नका हो ऽऽ!' म्हणून गयावया करावं अन् मग आपण आपला हात आवरावा. पण तो रडत नाहीं. दांत आवळून आंतल्याआंत चीत्कार करतो अन् दुसऱ्या तडाख्याला तयार होतो.

"माझ्या अंथरुणावर झोप म्हटलं तर ऐकायचा नाहीं. त्याला स्वतंत्र आंथरुण हवं अन् आईच्या जुन्या लुगड्याची चौघडीच पांघरायला हवी. तिचीं आतां लक्तरं लोंबायला लागलीं आहेत. म्हणून थोड्या दिवसांपूर्वीं एक नवं लुगडं विकत आणलं. माझ्या हातांत लुगड्याची घडी पाहून, आमचा एक शेजारी म्हणाला, 'यंदा बेत आहे वाटतं कुशाभाऊ! लवकरच जागे झालांत.' त्याला बिचाऱ्याला माझ्या यातनांची काय कल्पना! मी ती नवी चौघडी त्याच्या अंथरुणावर ठेवली तर त्यानं विसकटून फेकून दिली.

"याच ओटीवर आम्ही झोपतों. गोठ्यांतल्या गुरांची तेवढीच सोबत मिळते. आंतबाहेर दाटून आलेल्या अंधारांत आढ्याकडे नजर लावायची अन् रात्रीचीं घटकापळं मोजीत पडायचं. त्या वेळीं मग सगळ्या पूर्वस्मृति तरारून उठतात. भोगलेलीं सुखं जागीं होतात. भविष्यकाळ दिसतो; पण उदास...नीरस... निःसत्त्व!—अंतर्यामी चडफडून म्हणतो, 'कशासाठीं जगायचं? कशासाठीं?' पण लगेच अंतराळांत कुठून तरी दोन डोळे लुकलुकतात. परिचित पण अस्पष्ट असा शब्दहि ऐकूं येतो,

'कशासाठीं जगायचं हें अजून विसरायला होतं कां? शेजारीं झोंपलेल्या बाळासाठीं!'

"पण त्याला मी कुठें हवा आहे? ओढून आणावा तेव्हांच तो माझ्याजवळ येतो. सशाच्या काळजानं मांडीवर बसतो. अन् एखादे वेळीं आवडता खाऊ देऊन विचारावं, 'मधु! तूं माझा ना?' तर त्याच क्षणीं त्याची मान हलते, 'अंहं! मी आईचा!'

'म्हणूं दे. आतां तसं म्हटलं तरी मोठेपणीं तो तुमचा होईल. लोकहि म्हणतील कीं अमक्या—तमक्याचा मुलगा—'

" शास्त्रीबुवा, रात्रीच्या त्या खायला उठणाऱ्या एकांतांत वेड्या मनाचे असले कांहींतरी चाळे सुरू होतात. वाटतं कीं ती गेली खरी; पण जातांना माझ्या अंगणांत आनंदाचं एक रोपटं लावून गेली आहे. त्यालाच आतां छातीशीं घट्ट कवटाळून धरावं. त्याच्या श्वासांनीं, गारठलेल्या काळजाला ऊब आणावी. जो गोड पापा मला मागून मिळत नाहीं तो एकवार चोरून तरी घ्यावा. पण पोराला जवळ ओढायचा अवकाश; तो धुसफुसत, गडबडा लोळत चार हात दूर जातो सपशेल जमिनीवर. अन् मग आंवढे गिळीत मी उशींत तोंड खुपसतों. "

बोलतां बोलतां कुशाभाऊ चांगलाच गहिंवरला. त्याची मुखमुद्रा तांबूस झाली. छाती अन् खांदे यांच्यावरची लव फुलली. कर्तासवरता पोक्त माणूस; पण कारुण्यानं त्याला दीन करून सोडलं होतं. त्याचं दुःख दुधारी होतं. वात्सल्याचा अमृतकलश घेऊन तो त्या एकुलत्या एका बालजीवाच्या मार्गे धांवत होता; पण मुलगा असा विचित्र कीं तो त्यांतला एक तुषारहि अंगावर पाडून घ्यायला राजी नव्हता. शेवटीं कुशाभाऊनं मला विचारलं...

" शास्त्रीबुवा, तुम्ही पोथ्या पुस्तकं वाचलेलीं आहेत म्हणून तुम्हांला विचारतों. बापानं कितीहि केलं तरी त्याला आई होतां नाहीं कां हो येणार ? "

किती वेडा प्रश्न ! अन् जितका वेडा तितकाच काळीज कापणारा ! त्याला उत्तर होतं; पण तें नकारात्मक ! तें कसं सांगूं मी त्याला ? त्या वात्सल्य-रसाच्या सागराला तसं सांगून हिंपुटी करणं हें निदान मला तरी शक्य नव्हतं !

● ● ●

## चतुर्भुज ६

'लग्नाला विघ्नें फार' हा वाक्प्रचार शंभर टक्के कुठें खरा ठरत असेल तर तो आमच्या गोमंतकांत. गोवा सरकारनें त्यावर कितीतरी जाचक निर्बंध बसवले आहेत. 'मिया बिबी राजी तो क्या करेगा काजी' ही म्हण आमच्याकडे बाद झाली आहे. मिया-बिबी राजी असलीं तरी लग्ननोंदणी केल्याशिवाय त्यांना बोहल्यावर चढतां येत नाहीं. तें नोंदवायचें तर त्यासाठीं आर्धी कांहीं दिवसांची 'नोटिस' दिली पाहिजे. वधूवरांनीं देवी टोंचून घेतल्या पाहिजेत.एक ना दोन !

हे सगळे प्राथमिक विधि करून मी अन् कालिंदी रजिस्ट्रारच्या कचेरींत गेलों. त्या म्हाताऱ्या 'सायब्रा'नें आपले पिचपिचे डोळे साफ करून आमचे कागद पाहिले. कालिंदी सासुरवाशिणीसारखी खालच्या मानेनें दाराजवळ उभी होती. तिच्यावर एक दृष्टिक्षेप टाकून त्यानें मला विचारलें.

" हिचं वय काय ? "

" सोळा वर्षं. " मी सांगितलें.

" मुलगी अजून कायदेशीर रीत्या वयांत आली नाहीं. तेव्हां या लग्नाला तिच्या आईबापांची संमति लागेल. "

" त्यांची पूर्ण संमति आहे. " मी म्हणालों.

" हें तुम्ही सांगून नाहीं चालायचं. त्यांनीं इथें येऊन तशी सही केली पाहिजे. "

" मुलीचे वडील हयात नाहींत. "

" मग त्यांच्या मृत्यूचा दाखला आणा. "

" ते परमुलखांत वारले आहेत. अन् त्यालाहि बरींच वर्षें झालीं-तेव्हां तसा दाखला मिळवणं कठिण आहे. "

" मग तुम्हांला लग्न करतां येणार नाहीं मुलगी कायद्यांत येईपर्यंत. "

त्या थेरड्यानें ' मूले कुठार ' घातला. दिवस होता तरी माझ्या डोळ्यां-पुढें नक्षत्रें चमकलीं. मी अगदीं नरम होऊन त्याला म्हणालों,

" सायबा, असें करूं नको. आम्ही सगळी तयारी केली आहे. सणंग घेतलं आहे. मुहूर्त नक्की केला आहे अन् गांवोगांवीं आमंत्रणंसुद्धां—"

सायबानें कपाळाला आंठ्या घालून खांदे उडवीत म्हटलें,

" मी काय करूं त्याला ? "

" तूं आम्हांला हें आधीं सांगायला नको होतं का ? मुलीच्या जन्माचा दाखला पंधरा दिवसापूर्वीं मीं तुझ्या हातीं दिला होता. "

" मला कायदा शिकवतोस ! कायदा म्हणजे काय पोरखेळ वाटला तुला ? "

" मुळींच नाहीं ! पण कायदा म्हणजे जसा पोरखेळ नव्हे, तसा कायदा म्हणजे म्हातारचळहि नव्हे. "

हा मर्मप्रहार त्याला सहन झाला नाहीं. त्यानें ताडकन् उठून खुर्ची फर्र-दिशीं मागें ढकलली अन् आंतल्या दालनांत जातां जातां आम्हांला म्हटलें,

" तुमचं काम संपलं. तुम्ही येथून चालूं लागा. "

बाहेर आल्यावर आम्हीं एकमेकांकडे पाहिलें. कालिंदीच्या दृष्टींत कारुण्य ओसंडलें होतें. मी हतबुद्ध झालों होतों. कालिंदीनें आपल्या घरचे ' तीळ-तांदूळ ' खाल्ले आहेत कीं नाहीं याबद्दल माझ्या मनांत शंका उद्‌भवली होती.

दोन गांवचे दोन जीव आम्ही. यदृच्छेनें एका लग्नसमारंभांत आमची गांठ पडली. त्या एकाच दिवसाच्या सहवासांत आम्ही कितीतरी गोष्टी दिल्या-घेतल्या. हृदयांत उजळलेल्या प्रेमज्योतीचा प्रकाश तिच्या गालावर अन् माझ्या डोळ्यांत फांकला. अंतःकरणानें आम्ही स्थलकालाचें अंतर केव्हांच तोडलें होतें. आतां चार दिवसांत आमच्यामधला अंतरपाटहि दूर होणार होता; पण आम्हांला इतर कोणी विरोध केला नाहीं म्हणूनच कीं काय, आतां कायदा तरी आडवा पडला होता.

कालिंदीला तिच्या गांवीं पोंचती करून मी घरीं आलों. वडिलांना सगळी हकीकत सांगितली. ते संधिवातानें आजारी असल्यामुळें विशेषशी हालचाल करूं शकत नव्हते. त्यांनीं माझ्याकरवीं चार जाणत्या शेजाऱ्यांना

बोलावून घेतलें. त्यांच्यापुढें ही समस्या मांडली. त्यांत एकजण थोडा तर्कटी होता. कुठल्याहि कूटप्रश्नांत त्याचें डोकें धांवत होतें. तो म्हणाला,

" हें लग्न घडवून आणायचंच. ' कायदा जाणे बारा, तर हम जाणें साडे-तेरा. ' कायद्याच्या डोळ्यांत धूळ फेकायला कितीसा उशीर ! "

आणि मग साधकबाधक विचार होऊन निर्णय ठरला तो असा—

सर्वांनीं माझ्या मामाच्या घरीं जायचें. लग्नाची सारी तयारी तिथें करायची. तिथून पांच मैलांवर सह्याद्रीचा पायथा आहे. घाट चढून अर्धा मैल गेलें कीं हिंदुस्थानाची सरहद्द भेटते. तिथून पांच पावलें आंत शिरायचें. मंगलाष्टकें म्हणून तिथें वधूवरांना माळ घालायला लावायची. परत फिरून बाकीचे धार्मिक संस्कार मामाच्या घरीं करायचे आणि एवढें सगळें झाल्यावर कायद्याच्या नाकावर टिच्चून वाजत गाजत वरात घरीं आणायची.

या योजनेप्रमाणें आम्ही गोरज मुहूर्त ठरवून त्या दिवशीं दुपारीं मामाच्या घरीं गेलों. पूर्वसूचनेप्रमाणें मामानें सगळी तयारी जय्यत ठेवली होती.

दोन मांडवात दोघाचीं पुण्याहवाचनें बसलीं. मी या मांडवांत बसलों होतों; पण दृष्टि त्या मांडवांत गुंतली होती. तिथें कालिंदी खालच्या मानेनें बसली होती. आंबट ओल्या केंसांचा भरदार अंबाडा तिच्या मानेवर विसावला होता आणि मांडवावरच्या चुडतांतून प्रकाशाचा एक रुपयाएवढा कवडसा नेमका त्यावर पडला होता. तिच्या कुरळ्या केंसांना तेवढ्याच भागांत मनोहर चकाकी आली होती. तिनें नागचाफ्याचें फूल माळलें असतें तरी तो केशसंभार एवढा सनाथ झाला नसता. आपल्या मस्तकीं छायाप्रकाशांचा कसा नटनाच चालला आहे याची कालिंदीला खबरहि नव्हती. तें आगळें नयनसुख मलाच एकट्याला लाभत होतें.

एवढ्यांत वडिलांनीं हातांची ओंजळ करून पुण्याहवाचनाचा कलश वर उचलला होता अन् भटजी त्याला मस्तक टेकवायला मला सांगत होते. पण मला तें ऐकूंच गेलें नाहीं. माझ्या गुडघ्याला डिवचून स्मित मुद्रेनें ते म्हणाले,

" शिजेपर्यंत दम निघतो; निवेपर्यंत निघत नाहीं, खरं ना ? "

त्यांची ती गोड थट्टा खडीसाखरेच्या खड्याप्रमाणें मी कितीतरी वेळ मनांत घोळवीत राहिलों. दुपारीं कुकुडकुंब्यानें तिसरा प्रहर संपल्याची साद दिल्यावर आम्हीं लग्नाला जायची तयारी केली. माझे कांहीं शेजारी, मुलीच्या बाजूनें एक करवली, आमचे भटजी अन् एक गडी इतक्या मंडळींसह आमची विवाह-यात्रा सुरू झाली.

वाटेंत कुळवाडी, माळवाडी बरेच भेटले. आमचे लोक त्यांनीं न विचारतांच दाटून सांगत होते, " आम्ही लग्नाला चाललों. गोवा हद्दीच्या बाहेर. घाटांत तें चांदसुऱ्याचें पठार आहे ना, तिथें. " वेळ प्रसंग पडलाच तर साक्षीदार मिळविण्याची ही दूरदृष्टि होती.

चैत्र पौर्णिमा नुकतीच झाली होती. वसंतानें वनशोभेची खाण उघडली होती. वाटेच्या बाजूचीं झाडेंमाडें पालवून घनदाट झाली होतीं; पण मधेंच जी कधींमधीं उन्हाची तिरीप लागे तेवढ्यानेंच कालिंदीच्या गालांवर भिरंडें पिकलीं. घामाच्या धारांनीं कपाळींच्या कुंकवाला फांटे फुटले. वाऱ्याच्या दांडगेपणामुळें केशरचना विस्कटली; पण त्यामुळें कालिंदी मला अधिकच सुंदर दिसूं लागली.

आम्हांला तिथें पोंचायला किती तास लागतील, तिथें किती वेळ मोडेल अन् परत रात्रीं किती वाजतां घर गांठतां येईल याचें आम्ही कोष्टक बांधलें होतें अन् त्या बेतानें घरून निघालों होतों. पण त्या गणितांत चूक झाली होती ती ही कीं आमच्याबरोबर दोन मुली आहेत हें आम्हीं लक्षांत घेतलें नव्हतें. कालिंदी साधारणपणें आमचा पालव धरून चालत होती; पण तिची करवली अगदींच हळुबाई होती. वाटेंत एखादा बरासा दगड दिसला कीं ती फतकल मारायची अन् आपल्याबरोबर कालिंदीलाहि ओढून खालीं बसवायची.

अशा चालीनें इष्ट स्थळीं जाऊन मुहूर्त साधणें कठिण आहे असें माझें मन मला सांगूं लागलें होतें. क्षणाक्षणानें खालीं घसरणाऱ्या सूर्याकडे माझी सारखी नजर होती; पण आमचें गणित चुकलें असलें तरी त्याचें बरोबर होतें.

आणि झालेंहि तसेंच. मुहूर्ताच्या वेळेपर्यंत आम्ही जेमतेम सह्याद्रीच्या पायथ्याशीं येऊन पोंचलों. अजून एक चढण चढायची होती अन् त्या कामीं

अर्धा तास सहज जाणार होता. आमच्याजवळ दिवाबत्तीची कांहींच सोय नव्हती. चांदणें येणार होतें; पण डोंगरांत त्याचा कितीसा उपयोग ? कसें लग्न लावायचें ? अन् तिथून परतायचें तरी कसें ! तिथेंच मुक्काम करायचा म्हटलें तर सगळाच वषट्कार. ' चुटक्यांच्या मांडवांत जांभयांचा फराळ ! '

सगळ्यांनाच वाटलें कीं ' आतां पुढें कसें ? ' माझ्या मनांत अभोगत विकल्प उठला. अखेर माझें लग्न होणार आहे का नाहीं ? ' माझ्या या विकल्पाचें प्रतिबिंब मला कालिंदीच्या कोमेजलेल्या मुद्रेवरहि पाहायला सांपडलें. पण माझ्या शेजाऱ्यांना माझ्याइतकीच या लग्नाची काळजी होती. हें लग्न न लावतां ते परत फिरले असते तर गांवांत त्यांचीच अब्रू गाड्यावरून जाणार होती. पायथ्याजवळून वाहणाऱ्या नदीच्या कांठीं उभे राहून ते विचार करूं लागले. रघुनाथ त्यांना म्हणाला,

" आतां पुढें जायचं नाहीं. इथें कोण येणार आहे आपल्याला पाहायला ? जरासे वाट सोडून वरच्या बाजूला जाऊं अन् मुहूर्त साधून घेऊं. "

लागलीच तो पुढें झाला अन् आम्ही त्याच्यामागें निघालों. त्यानें एक छानदार जागा शोधून काढली. नदीकांठीं वृक्षराजीच्या मध्यभागीं बनलेलें तें एक चिंचोळें मैदान होतें. वाऱ्यानें तें आमच्यासाठीं झाडून ठेवलें होतें. वाळल्या गवतानें त्याच्यावर गालिचा अंथरला होता.

भटजींनीं पडशींतलें मूठ मूठ तांदूळ जमिनीवर घातले. आम्हांला समोरासमोर उभें केलें. डोक्याची हिरवी शाल सोडून तिचाच अंतरपाट बनवला. आणि एकदांचें म्हटलें,–' सुमुहूर्त ऽऽ सा ऽ वधान ! '

या वेळीं कालिंदी हें माझें सर्वस्व होतें; पण तें अंतरपाटाच्या दुसऱ्या बाजूला अदृश्य झाल्यामुळें माझी दृष्टि आसमंताकडे वळली. सूर्याची ' घटका ' बुडत आली होती. किरणजाल ओसरलें होतें. आतां फक्त उंच गिरि-शिखरावर पिवळी छटा तेवढी राहिली होती. उजव्या हाताला सह्याद्रि खडा होता. खालीं पश्चिमवाहिनी सरिता त्याचे चरण धूत होती. तिचा जलप्रवाह आटून कृश झाला असला तरी शंखासारखा स्वच्छ होता. काळवथर दगडां-वरून ठायीं ठायीं घरंगळत असतांना त्याचा ' रळरळ ' असा कलनाद अखंड चालला होता, तो मंगळाष्टकांपेक्षांहि कानाला गोड लागत होता. ह्या वृक्षावरून त्या वृक्षावर झेप टाकतांना वेलींनीं आमच्या मंगल कार्यासाठीं

पानाफुलांचीं तोरणें उभारलीं होतीं. वर आकाशानें निळा चादवा ताणून बांधला होता. वनदेवीनें आमच्यावरून गुलालाचें पाणी ओंवाळून पश्चिम क्षितिजावर फेकून दिलें होतें. डहाळ्यांवरून सभोंवतीं किलबिलाट करणारीं पांखरें आमच्या लग्नाचे 'ढवळे' गात होतीं. वनश्री चारी भुजा उभारून आम्हांला आशीर्वाद देत होती, 'नांदा सौख्यभरें!' अशा पुनीत वातावरणांत आम्ही दोघं एकजीव व एकरस होत आहों याचा मला अभिमान वाटला. ती संध्याकाळ नव्हती; तर तो आमच्या दांपत्यजीवनाचा उषःकाल होता.

इतक्यांत भटजींनीं अंतरपाट दूर केला. कालिंदीला माझ्या गळ्यांत माळ घालायला सांगितलें. तिनें हात उंच केले. मी मान किंचित् लववली. आपादमस्तक तिला न्याहाळून घेतांना कालिंदी मला साक्षात् वनदेवीचीच कन्या वाटली. एकच क्षण तिनें माझ्या दृष्टीला दृष्टि मिळविली. 'मी आतां तुमची झालें. सर्वभावें माझा प्रतिपाळ कराल ना?' हा भाव तिच्या घाऱ्या डोळ्यांच्या काजळी कडांवर तरंगत होता. मी तिला उत्तर दिलें तेंहि त्याच भाषेंत.

त्याच क्षणीं नदीचें पात्र ओलांडून पांचसहा लोक आमच्याभोंवतीं जमा झाले. त्यांनीं आम्हांला गराडा घातला म्हटलें तरी चालेल. त्यांच्या हातांत दंडुके होते, अंगांत मस्ती होती अन् मिशीला पीळ होता. त्यांच्यापैकीं एकानें पुढचा पवित्रा टाकून माझ्या शेजाऱ्यांना विचारलें,

"लग्न लावलंत ना यांचं इथें?"

काय द्यायचें या प्रश्नाचें उत्तर? 'होय' म्हणणें म्हणजे गुन्हा कबूल करण्यासारखें होतें अन् 'नाहीं' म्हणायला तोंड नव्हतें; पण बाकीचे मूढ बनले असले तरी रघुनाथ दडपून बोलला,

"लग्न? अन् इथें? छेः! आम्ही नुसते पाणी पिऊन पानतंबाखू खायला बसलों होतों. आम्हांला लग्न लावायचं आहे; पण तें इथें नव्हे. हद्दीच्या बाहेर. तिकडेंच निघालों आहों आम्ही."

"मग मंगलाष्टकं म्हणत होतां तीं कुणाला? या तांबड्या अक्षता जमिनीवर पडल्या आहेत त्या कसल्या? अन् ही बकुळीची माळ—" त्यानें सरळ माझ्या गळ्यांत हात घालून ती माळ वर उचलली.

त्या प्रश्नांच्या सरबत्तीवरून आम्हांला कळून चुकलें कीं यांनीं आम्हांला मुद्देमाल पकडलें आहे. रघुनाथाच्या धादांत खोट्या उत्तराला ते उपहासानें हंसले. नंतर तोच इसम भटजींकडे वळला.

“ तूं भट ना ? हें लग्न लावण्याबद्दलचा परवाना कुठें आहे तो आण ! ”

भटजींच्या पोटांत आवळे शिजले. त्यांनीं तंबाखूचा भरलेला बार एकदम सगळाच गिळून टाकला. त्यांचें तोंड उघडलें खरें; पण वाचा चांचरी जाऊं लागली. ‘ तुम्ही द्या ना या प्रश्नाचं उत्तर ! ’ असें त्यांची दृष्टि आम्हांला विनवीत होती; कारण कायद्याचा बडगा आमच्याबरोबरच त्यांच्याहि पाठींत बसणार होता. ‘ दक्षिणा नको; पण कुत्रा आवर ’ असें त्यांना झालें होतें.

ते लोक फिरंगी सरकाच्या जकात खात्याचे शिपाई होते. घाटावरून गूळ, तेल वगैरे माल खालीं उतरवायचा अन् जकात चुकवून तो इष्ट स्थळीं पोंचता करायचा या उद्योगांत एक टोळी तरबेज झाली होती. आज बरेच दिवस गोवा सरकार तिच्या मागावर होतें; पण अजून कोणाचा पत्ता लागला नव्हता. कुदळखणीच्या जकात अधिकाऱ्याला अन् रेजिदोरालाहि वरून ठपका आला होता. त्यांनींच या शिपायांना घाटांत रवाना केलें होतें अन् ‘ चोर पकडल्याशिवाय तोंड दाखवूं नका ’ अशी तंबी दिली होती. ते शिपाई कालची रात्र अन् आजचा सबंध दिवस पायथ्याजवळच्या रानांत रखडले होते. पण त्यांना चोरांची सांवलीसुद्धां दिसली नव्हती. सूर्यास्ता-बरोबरच त्यांचा उत्साहहि मावळला होता; पण हात हालवीत मेटावर परत जायला ते भीत होते.

आणि अशा निराशेच्या काळोखांत त्यांना आमचें ‘ सावज ’ सांपडलें होतें. जकातचोर नाहीं तर निदान ‘ लग्नचोर ’ तरी ते साहेबाच्या पुढें नेऊन उभे करणार होते.

पुढील भाविष्यार्थ लक्षांत आणून मी पुढें झालों. त्यांना खरीखुरी सगळी हकीकत सांगितली. कायदा मोडण्याचा आमचा उद्देश नव्हता हें त्यांना परोपरीनें समजावलें. कोणाच्या लग्नांत मोडता घालूं नये; शक्य तर तें जोडावें, हें नीतितत्त्वहि त्यांना ऐकवलें; पण ते कशालाच बधले नाहींत. त्यांनीं एकच उत्तर ठांसून सांगितलें तें हें.

“ तुम्ही मेटावर चला. तुम्हांला काय सांगायचं तें रेजिदोराला सांगा.”

ऐन राक्षसवेळेला आम्ही तिथून माघारीं फिरलों; पण तें मामाच्या घरीं जाण्यासाठीं नव्हे; तर मेटावर सरकारी पाहुणचार घेण्यासाठीं. आम्हांला मधें घालून ते शिपाई मागेंपुढें चालूं लागले. ज्या वाटेनें आलों त्याच वाटेनें आम्हांला बरेंचसें जायचें होतें; पण येतांनाच्या स्थितींत अन् आतांच्या स्थितींत महदंतर होतें. येतांना उमेद होती. आता देहाबरोबरच मनहि मेटाकुटीला आलें होतें. जीं तोंडें येतांना विनोद-परिहास करीत होतीं त्यांनाच आतां चिकटा बसला होता.

पाऊल पुढें अन् दृष्टि मागें अशी माझी चाल होती. कालिंदी माझ्या-मागून चालत होती. वस्तुतः फुलांच्या पखरणीवरून मी तिला चालवायला हवें होतें. पण तिच्या पावलांच्या वांट्याला आले होते ते खडेगोटे. गळ्यांत माळ पडते न पडते तोंच हे भोग तिच्यापुढें उभे झाले होते. अंतरांतल्या कोणकोणत्या वेदना तिच्या मुद्रेवर उमटल्या आहेत तें पाहाण्यासाठीं मी अधीर झालों होतों; पण त्या दाटीवाटीच्या जंगलांत अधूनमधून पडणारे चांदण्याचे कवडसे त्या कामीं मला कितीसे उपयोगी पडणार?

प्राप्त परिस्थितीचा मी जसजसा विचार करूं लागलों तसतसें तिचें गांभीर्य मला जाणवूं लागलें. कायद्यानें आमचें लग्न होऊं शकत नव्हतें. धार्मिक दृष्ट्या गळ्यांत माळ पडली होती; पण सप्तपदी झाल्यावांचून तिलाहि किंमत नव्हती. 'तुका दोहींकडे चोर' अशी आमची दशा होती. आम्ही दोघांनीं एकत्र राहायचें तर तें कोणत्या नात्यानें? कालिंदीकडे बोट दाखवून लोक कुजबुजणार होते, 'ही कुमारी कीं सौभाग्यवती?' हे सर्व अनर्थपात टाळायचे तर सप्तपदी करणें अपरिहार्य होतें. पण ती व्हायची कशी? आम्ही चाललों होतों भलतीकडेच!

मामाच्या घराकडे जाणारी वाट सोडून आम्ही आतां उजव्या हाताची मेटाकडे जाणारी वाट धरली होती. मेट सुमारें दोन मैलांवर होतें. मुक्काम जवळ जवळ येत असल्यामुळें शिपायांना आनंद झाला होता. एवढा वेळ बिनतक्रार मार्गक्रमण केल्यामुळें ते आतां आमच्याबद्दल निर्धास्त होते. जे आमच्यामागें चालत होते तेसुद्धां आतां पुढें होऊन विडीकाडीची देवघेव करूं लागले होते.

माझें मात्र चित्त ठिकाणावर नव्हतें. मी कांहीं तरी वेगळाच विचार करूं लागलों होतों. आम्ही दोघें सगळ्यांच्या मागें होतों. वाट एका टेकडीच्या मध्यावरून जात होती. दोन्हीं बाजूंना कारव दाट वाढलें होतें. चंद्राला आडोसा झाला होता. ही संधि सोन्याची होती. मी चटकन् कालिंदीचा हात पकडला. तिनें दचकून माझ्याकडे पाहिलें. मी नाकावर बोट ठेवलें. तिला हातीं धरून मी कारवाच्या जाळींत घुसलों. आमच्या लपंडावाचा कोणालाच पत्ता लागला नाहीं. पुढचे लोक आपल्याच नादांत पुढें निघून गेले.

मामाच्या घराकडे जाणारी जी वाट आम्ही सोडली होती ती आम्हांला टेकडीच्या पायथ्याशीं भेटणार होती; पण त्यासाठीं चांगलीच घसरगुंडी करावी लागणार होती. कालिंदीचें ओझें संभाळून एकेक पाऊल मोजीत मला खालीं उतरावें लागत होतें. तिनें माझा आधार कायमचा घेतला होता; पण मला मात्र पावलागणिक नवें झुडुप किंवा नवें मूळकंड पकडावें लागत होतें.

खालीं आल्यावर उघडें मैदान लागलें. मोकळी हवा मिळाली. स्वच्छ चांदणेंहि दिसलें. कालिंदी तिथें आली ती पाय पसरून बसलीच. ती अगदीं ' मिठाच्या होड्यावर ' आली होती, कांटेरी झुडपांनीं तिच्या पदराची चाळण केली होती. तिच्या हातांपायांवरहि ओरखडे उठले होते. दोनच क्षण मी तिला बसूं दिली अन् म्हटलें,

" कालिंदी, ऊठ. आतां अगदीं थोडं अंतर राहिलं. "

" नाहीं माझ्याच्यानं उठवत. पायांचे कसे तुकडे पडताहेत. "

" मग बैस माझ्या पाठुंगळीस. फुलासारखी झेलीत नेतों तुला. "

" इश्श ! "

आणि खरोखरच सगळें बळ एकवटून ती उठली. मी जवळ जवळ तिला ओढीतच नेऊं लागलों. मला आतां डोळ्यांपुढें सप्तपदी दिसत होती. तो लाजाहोम दिसत होता. हें सगळें मी घाईघाईनें उरकून घेणार होतों. अन् मग पडेल त्या प्रसंगाला निर्धास्तपणें तोंड देणार होतों.

पण पुरतीं सात पावलेंसुद्धां आम्ही टाकूं शकलों नाहीं. ज्यांच्या हातावर तुरी देऊन आम्ही निसटलों होतों तेच शिपाई पुढच्या बाजूनें टेकडी उतरून

धांवत आम्हांला आडवे आले होते. आम्ही ' नळी तासली ' हें त्यांना लवकरच कळून आलें होतें. अमुक बाजूनें अमुक ठिकाणींच आम्ही जाणार हें त्यांनीं हेरलें होतें. बाकीचे लोक गेले काय अन् राहिले काय त्याची तमा न ठेवतां आमच्यासाठींच त्यांनीं खालीं उड्या घेतल्या होत्या आणि पुनश्च आम्ही त्यांच्या हातीं गवसलों होतों.

" पळून जात होतास नाहीं का ? तुझ्यासारख्या छप्पन्न लोकांना पाणी पाजलं आहे आम्ही. आतां दुहेरी गुन्ह्यांत सांपडलास. " त्यांचा म्होरक्या शिरा ताणून म्हणाला आणि मग सगळ्यांनींच आमच्या भोंवतीं ' काव काव ' केलें.

त्यानंतर मेटावर येईपर्यंत त्यानें माझा हात सोडला नाहीं. आम्ही पायऱ्या चढतों तोंच आंतल्या घड्याळानें दहा ठोके दिले. मेटाचे दरवाजे बंद झाले होते. फिरंगी रेजिदोर केव्हांच झोंपीं गेला होता. त्याला उठवण्याची त्या शिपुरड्यांची ताकद नव्हती. त्यामुळें आतां आमचं काय करायचं याची भवति न भवति त्यांच्यांत सुरू झाली. आमच्यासारख्या धोकेबाजांना मोकळें ठेवण्याची त्यांची तयारी नव्हती. त्यावर तिथल्या पहारेकऱ्यानें तोंड सुचवली.

" बंदखणीची कोठडी आज मोकळीच आहे. तिच्यांत ठेवा डांबून अन् मोकळे व्हा. ही घ्या किल्ली. "

मेटाच्या अंगणांत डाव्या बाजूला एक लहानशी कच्च्या कैदेची कोठडी बांधली होती. एकानें आम्हांला तिथें नेऊन ती उघडली. तो शिपाई मोठा खवचट होता. तो कालिंदीला म्हणाला,

" चल ग होंकले भितर ! "

तिला आंत घालून तो मला बाहेर ठेवणार होता. त्यामुळें मी मोकळा राहूनहि पांगळून पडणार होतों. कालिंदीला तो त्याचा कावा कळला. ती शहारून म्हणाली, ' मी नाहीं जाणार एकटी ! '

" ना कशी ? जांवकच होयां. " त्यानें दटावणी दिली. त्यासरशीं कालिंदीनें मला मिठी मारली आणि झाडाला विळखा घालून राहिलेली ही वेल विलग करणें सोपें नाहीं हें जेव्हां त्याला कळून चुकलें तेव्हां त्यानें ' इंद्राय तक्षकाय स्वाहा ' म्हटलें.

आम्ही आंत कोंबले गेलों अन् दुसऱ्याच क्षणाला दरवाजा धाडकन् बंद झाला. लगोलग किल्ली फिरवल्याचाहि आवाज झाला. आपल्याला सोबत मिळाली या आनंदानें तिथल्या अंधाराचा ऊर भरून आला.

मी अंगांतला कोट काढून कोपऱ्यांत फेकला अन् टोपीहि टाकून दिली. आंधळ्यागत हात लांबवून कालिंदी कुठें आहे तें पाहिलें. ती जवळच होती. बसतां बसतां मीं तिलाहि खालीं ओढली.

“ कालिंदी ! ” मी भावपूर्ण हांक मारली.

तिचें उत्तर हुंदक्यांत आलें. एकापुढें एक ज्या गोष्टी घडत गेल्या त्यांनीं तिचें काळीज हादरलें होतें. आपण पुढें कुठें जाऊन पडणार याबद्दल अशुभ विकल्पांनीं तिला ग्रासलें होतें. जो लग्नाचा दिवस लेणीं, लुगडीं, गोड थट्टा अन् कौतुकाचे सोहळे यांनीं परम मंगल व्हायचा; त्याच दिवशीं तिचे हे असे ‘ साडे पोवाडे ’ झाले होते. शिवाय तिच्या देहकष्टांनींहि आज कड गांठली होती. कोमेजलेल्या नव्हे, तर पायदळीं तुडवलेल्या कळीची अन् तिची अवस्था आज एक झाली होती.

मी मायेनें जवळ करतांच तिचा स्फुंद अनावर झाला. तिची नाजूक, नकसूत काया गदगदून उठली. माझा सदरा भिजून छातीवर चिकटला. मी तिला संबोधून म्हटलें,

“ भिऊं नकोस. आपण सकाळीं इथून सुटूं अन् घरीं जाऊं. आपलं सगळं कांहीं यथासांग होईल. त्या शिपायाचे उपकार मान. त्याला द्रव आला नसता अन् तूं आंत नि मी बाहेर असा प्रसंग ओढवला असता तर—संकटांत सुद्धां सुख भेटतं तें हें असं ! ”

हें आश्वासन म्हणजे तिच्या जीवनाधाराचें आश्वासन होतें. त्यानें तिचें भयग्रस्त हृदय शांत झालें असावें. तिचे हुंदके थांबले. अश्रूहि ओसरले. तिची मान माझ्या खांद्यावर विसावली. इतक्यांत वाऱ्याची एक झुळुक झरोक्यावाटे हळूच आंत शिरली. मेटाच्या अंगणांत मोगरीचा ताटवा फुलला होता, तिचा सुगंध लुटून तिनें आमच्यासाठीं आणला होता. त्या सुगंधानें आम्हांला उत्तेजना दिली. गात्रांचा थकवा घालवला.

तें मेट अन् त्याच्या परिसरांतलीं घरकुलें शांत होतीं. त्या अटव्य रानांतला तो मानवी पुंजका निद्रावश झाला होता. आसमंतांतले वृक्ष आपल्या

लतावधूंसह निःस्तब्धपणें चंद्रामृताचें प्राशन करीत होते. स्थिरचरावर तंद्री पसरली होती. जागीं होतों तीं फक्त आम्ही दोघें. मी अन् कालिंदी ! दोन जीवनसरितांच्या प्रयागसंगमांत भय, चिंता, विकल्प, सगळें सगळें पार बुडून गेलें होतें. अनुभव घडत होता तो निर्भेळ ब्रह्मानंदाचा !

सकाळीं सूर्योदयाच्या वेळीं आमच्या रंगमहालाचें दार उघडलें. एका शिपायानें आम्हांला रेजिदोराच्या पुढें नेऊन उभें केलें. तो आम्हां दोघांकडे आळीपाळीनें पाहूं लागला. त्याच्या ओठांवर सिगरेटच नव्हती; तर मिस्किल हास्यहि होतें. शिपायांनीं ज्याचा एवढा बाऊ केला होता तें प्रकरण त्यानें तितक्या गंभीरपणें घेतलें नसावें असें त्याच्या एकंदर आविर्भावावरून दिसत होतें. मामा अन् गांवचा पोलिस्-पाटील समोरच उभे होते. जवळच्या टेबला-वरच रसबाळ्या केळ्यांचा एक घड अन् पांचदहा रसरशीत साखरलिंबें दिसत होतीं. एकंदरींत मामानें कळ फिरवली होती याबद्दल शंका नव्हती.

आम्हांला निरोप देण्यापूर्वीं रेजिदोराला आमची थट्टा केल्यावांचून राहवलें नाहीं. धुराचा एक लोट हवेंत सोडून हंसत हंसत पोर्तुगीजींत तो मला म्हणाला,

" कसा काय साजरा झाला तुझा हनीमून ? " मलाहि आतां उल्हास चढला होता. मीहि तितक्याच खेळकरपणें त्याला उत्तर दिलें.

" सिंज्योर ! मधाबद्दल म्हणाल तर समाधानाला जागा आहे; पण चंद्र मात्र अंधारांतच राहिला. "

कालिंदीच्या मुखाकडे एक प्रसन्न कटाक्ष टाकून दिलेल्या या उत्तरानें तो गोरा व उमदा प्राणी इतका मनसोक्त हंसला कीं, कालिंदीनें गालांवरचा लाजरा रंग मान फिरवून लपवला.



# लाडकी लेक ७

राजाभाऊंना एकंदर चार अपत्यें. दोन मुलींच्या पाठीवर एक मुलगा अन् शेवटची परत मुलगी. पुढच्या बाजूनें लांबवर पसरलेलें शेत अन् मागच्या बाजूनें खालीं ओढ्याला जाऊन टेकलेलें कुळागर यांच्या मध्यभागीं असलेल्या चौकाच्या घरांत हीं सर्व मुलें आईबापांच्या उबेंत वाढलीं. कालक्रमानें तिन्ही मुली आपापले संसार करायला '*परघरीं' निघून गेल्या आणि एक नवी मुलगी हळदीच्या अंगानें उंबऱ्यावरचें भरलें माप लवंडून त्यांच्या घरांत प्रविष्ट झाली.

राजाभाऊंच्या तिन्ही मुली सुस्थळीं पडल्या होत्या. त्यांचे पहिले दोघे जांवई कुळागरवाले अन् शेतीभाती करणारेच होते. जोंवर घाम गाळतील तोंवर त्यांना कांहीं कमी नव्हतें. धाकट्या मुलीच्या म्हणजे सईच्या नवऱ्याचें सांखळीच्या पेठेंत घर होतें अन् त्याच्या पुढच्या भागांत त्यानें किराणा भुसार मालाचें दुकान मांडलें होतें.

आईबापांना सगळीं मुलें सारखीं हें जरी खरें असलें तरी त्यांतल्या त्यांत सईवर राजाभाऊंचा विशेष जीव होता. 'कुसधुणी' मुलगी हें एक त्यांतलें महत्त्वाचें कारण. याशिवाय सगळ्या मुलींत ती अधिक गोरी अन् रेखीव होती. नाजुक खाणारी, नाजुक बोलणारी, अशा सर्व प्रकारें ती 'नाजुक नार' होती. लहानपणीं तिनें एकटीनें जितकें राजाभाऊंचें 'अंगमर्दन' केलें होतें तितकें इतर तिघांनीं मिळूनहि आपल्या बालपणीं केलें नसेल. ती घरांत खोड्या करी, फुरंगटून बसे म्हणून आई तिला कित्येकदां धम्मकलाडू चारी. भावंडेंहि कधींमधीं तिच्या गालांचीं सफरचंदें करीत. पण राजाभाऊंच्या हाताचीं पांच बोटें कधींहि तिच्या पाठीवर उठलीं नाहींत. आईच्या रागानें मुसमुसत ती राजाभाऊंच्याकडे येई अन् त्यांच्या छातींत तोंड खुपसून बसे. आणि मग तिला हंसती बोलती करायला राजाभाऊंना आपल्या अंतरांतली

सारी कोवळीक पणाला लावावी लागे. पितापुत्रींची ही ' घु[illegible] आवडी ' पाहून सईची आई राजाभाऊंना म्हणे—

" पोरीच्या जातीवर एवढी माया करणं चांगलं नाही. पुढें जड जाईल तें. ' अति सर्वत्र वर्जयेत् ! "

पण राजाभाऊंना असलें तत्त्वज्ञान कुठलें पटायला ! त्यांचा स्वभावच तसा होता. एखादें माणूस आवडलें कीं, ते त्याच्यावर सगळा जीव ओतीत आणि एखाद्याविषयीं अप्रीति उत्पन्न झाली कीं, त्यांच्या अंतरांतली रसगंगा कायमची आटे.

सईला सांखळीसारख्या शहरीवळणाच्या गांवीं स्थळ मिळालें या गोष्टीचा सर्वांत त्यांना जास्त आनंद झाला होता. सांखळी म्हणजे त्या बाजूची अखंड वाहती वाट. वाळपई ते सांखळी बस सर्व्हिस असल्यामुळें सईला आणणें नेणें या गोष्टी राजाभाऊंना सुलभपणें करतां येत. इतर दोघी मुलींचें तसें नव्हतें. त्या अगदींच आडवळणाच्या खेडेगांवीं पडल्या होत्या.

सईच्या लग्नापासून राजाभाऊंच्या सांखळीच्या खेपा वाढल्या होत्या. सोमवारचा बाजार ते क्वचितच चुकवीत. विकायला आणलेल्या आंबे, फणस, केळीं, लिंबें, वगैरे मालांतली निवडक चीज आधीं सईच्या घरीं जायची अन् मग उरलेल्याला बाजार दिसायचा. एका सोमवारीं ते आपल्या पंचांत बांधलेलीं दोन नारळाएवढीं पक्व रामफळें अलगद बाहेर काढून सईला म्हणाले,

" सयो ! माल आहे नुसता. चार दिवसांपूर्वीं तोडून भाताच्या राशींत पुरून ठेवलीं. म्हटलं, सोमवारला माझ्या पांखराच्या चोचींत पडूं देत. जा, तुझ्या नवऱ्याला बोलाव. "

तो येणार नाहीं हें सईला ठाऊक होतें. तिनें बाहेर जाऊन दुकानांत डोकावल्यासारखें केलें अन् परत येऊन राजाभाऊंना म्हटलें,

" भाऊ, दुकानांत गिऱ्हाइकांची गर्दी आहे हो ! आज सोमवार ना ? ते आतां येणार नाहींत. मी दुपारीं देईन त्यांना, हं ऽऽ ! "

राजाभाऊ किंचित् रुष्ट झाल्यासारखे दिसले अन् क्षणभर थांबून म्हणाले, ' बरं आहे ! ' सईला तें जाणवलें. तिला पुष्कळदां वाटे कीं, भाऊ आले म्हणजे आपण तिघांनीं एकत्र बसून चहा घ्यावा, त्यांच्या[illegible]ती गोष्टी

मोकळेपणानें बोलाव्या, यांनीं आपली कांहीं तरी आगळीक सांगावी, भाऊंनीं यांची कड घेऊन माझ्यावर लटकें रागवावें, आपण भाऊंच्यावर तोंडदेखलें रुसावें, अन् मग भाऊंनीं आपल्या पाठीवर थोपटून म्हणावें, 'वेडं कोकरूं.'

पण विश्वनाथ त्या गोष्टीला राजी नव्हता. तो राजाभाऊंचा संपर्क जाणून-बुजून टाळीत असे. आपल्याला जसे भाऊ जिवाआगळे आवडतात तसेच ते नवऱ्यालाहि आवडावे ही तिची पोटांतली कळकळ होती. 'आपले भाऊ किती चांगले आहेत अन् तुम्ही का हो त्यांना टाळतां?' असें तिनें सहज एक दिवस म्हटलें तर विश्वनाथ तिच्यापुढें हात ओवाळून म्हणाला,

"अहाहा! काय दिव्य तुझे भाऊ! काय तें पोकळ कासोट्याचं तोकडं धोतर! अन् काय ती बाराबंदी! तिचे बंदसुद्धां धड बांधलेले नसतात. अन् ती रुमाल बांधण्याची तऱ्हा तर कांहीं विचारूंच नका—कुठल्या युगांत वावरतात ग तुझे भाऊ? जग किती सुधारलं आहे अन् कुठं पोंचलं आहे, याची कांहीं दखलगिरी आहे का त्यांना! हें असलं 'ध्यान' भरल्या बाजारांतून हिंडायला लागलं कीं आजूबाजूचे वाणी—बामण हंसतात माझ्याकडे बघून. सोमवार म्हणजे घातवार झाला आहे माझा—"

सईचें जें पूजास्थान तेंच विश्वनाथानें आपलें उपहासस्थान बनवलें होतें. त्यांचें नांव घेऊन तो तिला अनेक वेळां डिवचीत होता. आघाताला प्रत्याघात करण्याचें सामर्थ्य तिच्या अंगीं नव्हतें. तेवढी सवलत त्यानें तिला कधींच दिली नव्हती. कधीं तरी असा एक दिवस उगवो अन् आपल्या भाऊंचें उदारचरित घसघशीतपणें यांच्या अनुभवाला येवो असें ती मनोमन देवाला प्रार्थीत होती. तसें झाल्यावर मग ती विश्वनाथाला विचारणार होती, 'सांगा आतां. कसे आहेत आपले भाऊ?'

तिच्या सुदैवानें अथवा दुर्दैवानें म्हणा, तसा प्रसंग पुढच्याच वर्षीं उभा राहिला.

आषाढ संपत आला होता आणि एक दिवस मेघराजानें पर्जन्यास्त्र मोकललें. सरीवर सरी कोसळून गेल्या; तरी आकाशाचा एक कोपरासुद्धां निवळेना. लागोपाठ चार दिवस अभिषेकाची धार खळली नाहीं. चवथ्या मध्यरात्रीं गांवाच्या मधून वाहणाऱ्या नदीला जिभा फुटल्या. लालभडक

पाणी लोंढयालोंढयांनीं पेठेंत शिरूं लागलें. लोक जागे होतात तों रस्त्यावरून होड्या चालविण्याची वेळ आली होती. कोणाच्या पायरीला पाणी लागलें होतें तर कोणाच्या दुकानांतहि शिरलें होतें. जो तो दडपल्या काळजानें 'पुढें काय' म्हणतो, तोंच दुकानांतल्या पाट्या अन वस्तु पाण्यावर तरंगूं लागल्या. पण जिवावरच नौबद गुदरली तिथें मालमत्तेचा कोण केवा! दार उघडलें कीं बाहेर धडका देणाऱ्या पाण्याचा लोट आंत उडी घ्यायचा.

ज्यांच्या घरांचे चौथरे उंच होते त्यांना विशेषशी तोशीस बाधली नाहीं. ज्यांचीं घरें जलमय झालीं होतीं अशीं माणसें कशींबशीं बाहेर पडून अन् जें कांहीं 'मौल्यवान्' होतें तें उरापोटाशीं धरून त्या उंच घरांच्या आश्रयाला आलीं.

सई, विश्वनाथ अन् त्याची आई हीं तिघेंहि त्यांत होतीं. पहांटेच्या प्रहरीं ती अनुधार पर्जन्यवृष्टि थांबली अन् पूरहि ओसरूं लागला. उजाडलें अन् आपोदेवीचें तें उद्दंड तांडव सर्वांना उघड्या डोळ्यांनीं पाहतां आलें. सगळी पेठच्या पेठ उजाड अन् ओंगळवाणी दिसूं लागली. बरीचशी पडझडहि झाली. त्यांत विश्वनाथाचें घर तर सपशेल निजलें. पाण्याच्या धडकांपुढें त्या जीर्ण वास्तूचा टिकाव लागला नाहीं. विश्वनाथ दोन आश्रित अबलांसह आपल्याच गांवांत परदेशी झाला.

राजाभाऊंना ही वार्ता समजतांच त्यांचें काळीज गलबललें. गजेंद्रासाठीं वैकुंठाधिपतीनें धांव घ्यावी, तसे राजाभाऊ सईचे कैवारी होऊन धांवले. त्यांनीं धीराचा शब्द दिला तेव्हां सईच्या नेत्रांत आणखी एक पूर खळाळला. ती स्वतःशींच म्हणाली, 'माझे भाऊ!'

सई, विश्वनाथ अन् त्याची आई या तिघांनाहि राजाभाऊंनीं आपल्या घरीं आणलें. त्यांनीं आपल्या घरच्या मंडळीला बजावलें कीं, 'सोयऱ्यांना त्यांच्या विपन्नदशेची एका शब्दानेंसुद्धां जाणीव देतां कामा नये.' तीन चार महिने ही मंडळी त्यांच्याकडे राहिली. त्या अवधींत विश्वनाथाचा 'जांवईडौल' संभाळतांना राजाभाऊंनीं कधींहि कसूर केली नाहीं.

संगतीला राहून अन् पंगतीला जेवून राजाभाऊंना विश्वनाथाच्या स्वभावाचें समालोचन सूक्ष्मपणें करतां आलें. तो कुढा होता. भुंग्यासारखा 'कुसें' मारणारा होता. आपण सुधारलेले अन् हीं माणसें 'जुनाट जुगादीचीं;'

अतएव दूर ठेवण्याजोगीं हें तो आपल्या प्रत्येक शब्दांतूनच नव्हे; तर दृष्टिक्षेपांतूनहि व्यक्त करी. पण राजाभाऊंना सर्वांत अधिक वाईट वाटे तें तो सईशींसुद्धां अधिकाराच्या गुर्मीत वागत होता त्याचें.

कार्तिक महिना लागला अन् विश्वनाथ परत घर उभें करण्याच्या गोष्टी बोलूं लागला. पण ते विचार कृतींत येण्याच्या कामीं कुठें घोडें अडतें तें राजाभाऊंनीं ओळखलें. आपल्या घराच्या दुरुस्तीसाठीं चिरून खोपींत रचून ठेवलेलीं फणशी लांकडें त्यांनीं गाडीवरून सांखळीला वाहून नेलीं. हजार पांचशें आपल्या पेटींतून बाहेर काढले. महिना दीड महिना ते स्वतः तिथें उन्हातान्हांत खपले. त्यांच्या सईचें नवें घर उभें झालें. वास्तुशांतीला पन्नास पान जेवलें. पण त्यांत राजाभाऊ मात्र नव्हते. त्यांचे एक 'पड' तांदूळ नेहमींप्रमाणेंच त्या दिवशींहि तळीवरच्या नाइकांच्या घरीं शिजले.

त्या दिवशीं नारळाचा आपरस घालून केलेली गव्हांची 'सोजी' सईच्या घांटीखालीं उतरली नाहीं. कारण तिच्या भाऊंना ती चुकली होती. त्या बाबतींत तिचा निरुपाय होता. मुलीला मुलगा झाल्याशिवाय तिच्या घरीं हात उष्टा करायचा नाहीं हा रूढ शिष्टाचार सगळ्याच मुलींच्या बाबतींत राजाभाऊंनीं कटाक्षानें पाळला होता. तिच्या थोरल्या बहिणीच्या घरीं मुलाच्या बारशाच्या दिवशींच ते जेवले होते.

किंचित् उंचावलेल्या आपल्या पोटाकडे तिनें सहेतुक दृष्टि वळवली. त्याच दिवसांत तिला 'हवें नको' झालें होतें. 'भाऊ आपल्या घरीं जेवतील असा दिवस आतां फार लांब नाहीं. अवघे सात महिने...' आणि या विचारासरशी तिला लाजल्यासारखें झालें.

त्या रात्रीं नव्या घराचा विषय आला असतां सईला भाऊंच्याबद्दल बोलल्याशिवाय राहवेना. 'आपल्यासाठीं भाऊंनीं खूप केलं नाहीं का ?' ती विश्वनाथाला म्हणाली. तिनें त्या प्रश्नाचें उत्तर अपेक्षिलें होतें, 'होय सई. माझा त्यांच्याबद्दलचा ग्रह पालटला. भाऊ म्हणजे आपल्याला फार मोठा आधार आहे.' या उत्तरावर ती भुजलतांनीं त्याला वेढून दृष्टींतलें प्रसादसौम्य चांदणें त्याच्या मुखावर पसरीत लाडक्या शब्दांत विचारणार होती, 'खरंच ?'

पण विश्वनाथानें दिलेल्या अनादराच्या तुटक उत्तरानें तिचा पाणउतारा झाला. स्वतःच्या आवडत्या व्यक्तीला बोललेलीं दुरुत्तरें अधिक वर्मी झोंबतात, हा तिचा अनुभव नवा नव्हता. पण आज तो तिला विशेष जाणवला. त्या दिवसापासून मात्र तिनें ठरवलें कीं, 'यापुढें भाऊंचा विषय बंद !'

त्यानंतर राजाभाऊ सईच्या घरीं आले ते पुरत्या दोन महिन्यांनीं. अलीकडे त्यांच्या मनांत एक विचार प्रबळ झाला होता कीं, आपली जी कांहीं शेतवाडी आहे ती आपल्या हयातींत मुलाला निर्वेध करून ठेवावी. राजाभाऊंना चार मुलें; म्हणजे फिरंगी कायद्याप्रमाणें मिळकतीचे चार समान विभाग होत होते. मुलींचा अन् त्यांच्या द्वारें जांवयाचा हक्क सोडवून घ्यायचा तर त्यांना कांहींतरी 'दक्षिणाः पान्तु' करणें जरूर होतें. त्यांनीं जें कांहीं द्यायचें ठरवलें होतें, त्याला वरचे दोघे जांवई 'राजीखुषी' झाले होते आणि तिसऱ्या जांवयापुढें तोच प्रस्ताव मांडण्यासाठीं ते आज आले होते.

पण विश्वनाथ साध्या शब्दांनीं बधेना. तो म्हणाला, 'असलं मोघम बोलूं नका. तुम्ही काय द्यायचं ठरवलं आहे तें नक्की आंकड्यांत सांगा. म्हणजे विचार करायला बरं.'

राजाभाऊ विश्वनाथाच्या चेहऱ्याकडे बघतच राहिले. बोलतो आहे तो विश्वनाथच का दुसरा कोणी याची त्यांना क्षणभर शंका आली. पण तो भास नसून साक्षात्कार होता. त्यांनीं किंचित विषादयुक्त स्वरांत म्हटलें,

"यांत विचार करण्याचा प्रश्नच येत नाहीं. सासऱ्याच्या मिळकतींत आपल्याला वांटा आहे ही गोष्ट तुम्ही मनांतसुद्धां आणतां कामा नये. कायद्यापेक्षां सद्भावनेनें हे प्रश्न सोडवायचे असतात. परंपरा अशीच चालत आली आहे. माझ्या शक्तीप्रमाणें मी तुमचा हात ओला केल्यावांचून राहाणार नाहीं. मी जें देईन, तें सुखासमाधानानें तुमचें कल्याण चिंतून देईन. तुम्ही तें आशीर्वाद समजून घ्यायचं अन् उदार मनानें सही द्यायची."

विश्वनाथ त्यावर कांहीं बोलला नाहीं. 'मौनं संमतिदर्शनम्' असें राजाभाऊ गृहीत धरून चालले. त्यांनीं पुढचा बेत विश्वनाथाला सांगितला.

"येत्या बुधवारीं मी तुम्हां दोघांना सर्वांच्या बरोबर डिचोलीला घेऊन जाईन."

बुधवारची ती बस राजाभाऊंचा सगळा कुटुंब-काफिला घेऊन सांखळी-च्या स्टँडवर थडकली. राजाभाऊ उतरून सई-विश्वनाथांना घेऊन आले. सई आधीं अन् विश्वनाथ तिच्या पाठोपाठ गाडींत चढला. दोघी मोठ्या बहिणींनीं सईला मधें घेतलें. सई किती छान दिसली त्यांना ! तिच्या काये-वर गर्भच्छाया विलसली होती अन् मूळच्या गोऱ्या वर्णात केतकी छटा मिसळली होती.

" आई, कधीं ग नेणार तूं हिला बाळंतपणाला ? " थोरल्या बहिणीनें विचारलें.

" नेईन कीं सातव्या महिन्यांत. आत्तां कुठें पांचवा संपतो आहे." आईनें एक कौतुकाची चोरटी नजर विश्वनाथावर टाकून उत्तर दिलें.

डिचोलीला उतरून राजाभाऊ प्रथम सरदेसाई वकिलांना भेटले. त्यांना घेऊन मग ते तांबेलियांवाच्या कचेरींत गेले. रीतसर कागद लिहून झाला. राजाभाऊंनीं पांचपांचशें रुपये प्रत्येक जांवयाच्या हातावर ठेवले. अनुक्र-मानें वरचे दोन जांवई अन् दोघी मुली यांच्या सह्या झाल्या. शेवटीं सर-देसाई वकील विश्वनाथाला म्हणाले.

" हं, आतां तुम्ही उठा."

पण विश्वनाथ आपली खुर्ची न सोडतां म्हणाला,

" अजून जरा वांधं आहे. माझ्या बायकोचं म्हणजे यांच्या मुलीचं मला असं सांगणं आहे, कीं एक हजार रुपये घेतल्याशिवाय मी सही करूं नये."

त्यासरशी सर्व मंडळी चित्रासारखी स्तब्ध झाली. सुसूत्रपणें चाललेल्या व्यवहाराला तो एकाएकी बसलेला खटका होता. त्यामुळें राजाभाऊंचा श्वास एकदम अवरुद्ध झाला. ' आपण हें काय ऐकतों ? सई असं सांगेल ? छेः! अशक्य ! खात्रीनं हें विश्वनाथाचंच कुटिलपण असलं पाहिजे.' म्हणून लटक्याला घरापर्यंत पोंचवण्याच्या उद्देशानें त्यांनीं विचारलें.

" होय का ग सई, तुला हजार रुपये हवेत ? "

पण ती होयहि म्हणेना अन् नाहींहि म्हणेना. तिची वाचाच बसली. राजाभाऊंच्या इतकीच तिलाहि ही गोष्ट अकल्पित होती. तिनें विश्वनाथा-च्या मुखाकडे एकवार अशरण दृष्टीनें पाहिलें. त्याच्या मुद्रेवर ताठरपणा होता अन् डोळ्यांत भालेफेक होती. मोटारींत चढायच्या आधीं त्यानें

ठासून उच्चारलेले शब्द परत तिच्या कानांत घुमले. ‘ खबरदार तिथें एक अक्षर बोललीस तर...’ त्या धाकानेंच आतां तिचा गळा दाबला होता. तिला कांहींतरी बोलायचें होतें. हृदय पिळवटून तिला कांहींतरी सांगायचें होतें. पण...पण... आंतून येणारे कढ गटागट गिळीत तिनें भिंतीशीं आपल्या जिवाचा संकोच केला होता.

राजाभाऊंच्या मनांत संशयाचें बीज पडलें, माया गढूळ झाली, विश्वास दुभंगला. वृत्ति बदलली कीं शब्दहि ताबडतोब बदलतो. ‘ सयो ’ ही त्यांची लाडकी हांक नेहमींच अमृतानें भिजलेली असायची. पण ती भावसरिता आतां एकाएकीं आटली. कोरड्या, उदास स्वरांत ते फक्त इतकेंच म्हणाले,

“ हें आधीं सांगायला हवं होतंस तूं मला. म्हणजे मी तुला इथवर येण्याचे श्रम दिले नसते. ”

इतर दोघी मुली एवढा वेळ हा सगळा प्रकार ऐकत होत्या. भिंतीचा आधार घेऊन जिवाला सांवरणाऱ्या सईकडे पाहातांना त्यांचे ओठ मुरडत होते. त्यांच्याजवळ बसलेली असूनहि ती त्यांना दूर झाली होती. त्यांतली आक्का होती तिला तर बोलल्याशिवाय राहावेंच ना.

“ भाऊ, सयो तुमची लाडकी ना ? घ्या आतां. तीच तुमच्या टाळूचे केस उपटायला निघाली. आजवर देहाचीं काष्ठं केलींत तिच्यासाठीं. त्याचे उपकार ही या रीतीनें फेडते आहे. आम्हां दोघींना दिलेल्यांतले अडीचअडीचशें रुपये परत घ्या अन् हिची भर करा. हे माझे. दुर्गे, काढ तुझ्यांतले अडीचशें—”

“ नाहीं मुलींनो ! तो मी तुम्हांला दिलेला आशीर्वाद आहे. मी त्यांतलं कांहीं परत घेणार नाहीं. तिला सही करायची नसली तर न करूं दे. ती घेऊन घेऊन काय घेईल ? माझ्या मिळकतींतला चौथा वांटा ! तो जरी तिनं घेतला तरी माझ्या पोराच्या अदृष्टांतलं कांहीं तिला काढून घेतां येणार नाहीं. ”

पण राजाभाऊ डोक्यांत राख घालून पट उधळायला निघाले हें वकील-साहेबांना बरें वाटलें नाहीं. कारण पुढच्या संभाव्य आपत्तीचें अन् गुंता-गुंतीचें त्यांना आकलन होतें. त्यांनीं राजाभाऊंना बाजूला बोलावून नेऊन

हिताचा सल्ला दिला. निरुपायानें राजाभाऊंनीं त्याला मान तुकविली. सरदेसायांनीं मग विश्वनाथाला बाजूला घेऊन त्याच्या कानांत कोणतीं अक्षरें फुंकलीं देव जाणे! पण तो साडेसातशें रुपयांवर तडजोडीला तयार झाला. तेवढी रक्कम जादा घेऊन कष्टी मुद्रेनेंच त्यानें सही केली.

"फार ताणून धरणं बरं नव्हे. आपलींच माणसं आहेत तीं–" असा औदार्याचा भाव आणून त्यानें सईला सही करायला फर्मावलें. आपल्या कांपऱ्या हातानें सईनें नवऱ्याच्या सहीखालीं आपली नाममुद्रा उठवली.

मोटारस्टँडकडे परत जातांना विश्वनाथानें सईचा पालव सोडला नाहीं. माहेरच्या मंडळींशीं सईला एकांत करूं देण्याची त्याची इच्छा नव्हती. तो मंडळींच्या बरोबर मोटारींतहि चढला नाहीं. 'आम्ही दोघें मागच्या मोटारीनें येऊं' असें त्यानें राजाभाऊंना सांगितलें. तें ऐकून 'बरें झालें; पिडा टळली' असेच सर्वांच्या मुद्रेवर भाव उमटले. तीं सगळींच माणसें सईवर फुगलीं होतीं. पण राजाभाऊसुद्धां आपल्याकडे न बोलतां, न बघतां मोटारींत चढलेले जेव्हां सईनें पाहिले, तेव्हां तिच्या काळजाला सहस्र सुया बोंचल्या.

थोडा वेळ 'घर घर' करून मोटार सुरू होतांच सईनें हांक फोडली, 'भाऊ ऽ ऽ!' पण तो आवाज बाहेर फुटायच्या आंतच तिनें रुमालाचा हात आपल्या तोंडावर दाबला. चार अश्रुबिंदु टपटपून तिच्या हृदयावरच्या पदरांत मुरले. डोळे कोरडे करून ती पुढें पाहाते तों मोटारनें उठवलेल्या धुळीचे लोट. तिचे भाऊ अदृश्य झाले होते, दूर गेले होते.

सई घरीं आली अन् तिनें जमिनीवर अंग टाकलें. तिचा देह तर दमला होताच; पण मन त्याहून व्याकुळ झालें होतें. कां कोण जाणे; पण आपण निराधार झालों असें तिच्या मनानें घेतलें. विश्वनाथ बाहेर चार मित्रांपुढें आपल्या मुत्सद्देगिरीचे दिवे पाजळीत होता, तें तिला असह्य होत होतें. तिचा आत्मा मुकेपणें आक्रंदत होता. 'तुमच्या लोभासाठीं तुम्ही माझा बळी दिलात. माझं माहेर बुडवलंत.'

इकडे सई तसेच तिकडे राजाभाऊ. अडीचशें रुपये अधिक गेल्याची त्यांना हळहळ वाटत नव्हती. तेवढी रक्कम त्यांनीं आपल्या लाडक्या लेकीवरून ओवाळून टाकली असती. पण तिनें ते अडवून घेतले, नवऱ्यानें

मांडलेल्या कपटद्यूतांत तिनेंहि एक फांसा टाकला, हें शल्य त्यांच्या जिव्हारीं झोंबलें. त्या धोपटमार्गी पुरुषाचा स्वाभिमान दुखावला गेला. कांहीं केल्या त्यांच्या मनांतून ती गोष्ट जाईना. तो प्रसंग वारंवार त्यांच्या डोळ्यापुढें उभा राहून त्यांना बजावूं लागला, ' लाळेनें चणे गोड करूं पहातोस; पण फुकट आहे तें. आतां हे मायापाश तोडून टाक ! '

राजाभाऊंनीं सांखळी सोडली. आठवड्याचा बाजार आतां त्यांचा मुलगाच करूं लागला. पण त्यानेंसुद्धां बहिणीचें घर हें न जाण्याचें ठिकाण ठरवलें होतें. सोमवारीं सकाळीं रस्त्यावर मोटारचें शिंग वाजलें कीं, सई डोळ्यांच्या पणत्या घेऊन दारांत येई अन् आंत भाऊ दिसतात का पाही. भाऊंना पाहाण्यासाठीं तिचा जीव आर्त झाला होता. ' सयो ' ही मायाभरली हांक ऐकण्यासाठीं तिचे कान अधीर झाले होते. ज्या व्यक्तीवर अन्याय करावा ती फिरून फिरून स्मरणांत उभी रहाते. जागृतींतच नव्हे; तर स्वप्नांतसुद्धां ती पाठ सोडीत नाहीं. सई याच स्थितीचा अनुभव घेत होती.

जाणिवेची ही बोचणी थांबवावी म्हणून ती तिला थातुरमातुर करीत होती. ' सातव्या महिन्यांत माहेरीं गेल्यावर मी प्रथम भाऊंचा गैरसमज दूर करीन. त्यांची आटलेली माया फिरून ' जिवस ' करीन. पण सातवा महिना लागून संपत आला तरी तिला माहेरचें मूळ आलें नाहीं. आशेचा किरण घेऊन दिवस उगवायचा, प्रतीक्षेत तो लांब व्हायचा अन् अखेर निराशेंत बुडायचा. प्रत्यहीं जड होणारा आपला जीव एकदां आईच्या ओटींत नेऊन घालावा असा तिला ध्यास लागला होता.

पण आतां सुरू झाला आठवा महिना. या महिन्यांत गर्भारशीनें माहेरीं जायचें नसतें हें तिला ठाऊक होतें. नवव्या महिन्यांत बोलावणें आलें तर आपल्याला मोटारचे धक्के सोसतील का याची उगीच तिला धास्ती वाटत होती. पण नववा लागूनहि जेव्हां माहेरचा माघारी आला नाहीं किंवा चार शब्दांचा निरोपहि आला नाहीं, तेव्हां तिची खात्री झाली कीं, आपली आशा व्यर्थ आहे. माहेरच्या माणसांनीं आपलें नांव टाकलें.

तिला तें सत्य उमगलें; पण सोसलें मात्र नाहीं. अन् वरून नवऱ्याचे डंख. ' वस्ताद म्हातारा. मला जादा दिलेले अडीचशें रुपये अशा रीतीनें वसूल करतो आहे. '

त्यानंतर कांहीं दिवसांनीं जो भेटेल तो विश्वनाथाकडे पेढे मागूं लागला. त्या घरांत एक नवा जीव रडत होता अन् बाकीचीं सगळीं हंसत होतीं. सईच्या मनांतलीं किल्मिषें कुठल्या कुठें उडून गेलीं. त्या लहानग्याच्या टकमक दृष्टींतल्या किरणांनीं तिच्या हृदयाचा कानाकोपरा उजळून निघाला. बारशाचा बेत महिन्याच्या दिवशीं ठरला. राजाभाऊंना आमंत्रण गेलें. सई मनांत म्हणाली,

'... आतां आपले भाऊ नक्की येतील. आलंच पाहिजे त्यांना. सईसाठीं नसलं तरी तिच्या बाळासाठीं. अन् आले म्हणजे त्यांना आमच्याकडे जेवलंच पाहिजे. भरल्या पानावर बसून माझ्या घरीं आपोष्णी घेतांना मी त्यांना डोळेभर पाहीन. बाळाला घेऊन मी त्यांच्या शेजारीं बसेन अन् आग्रहाच्या जेवणाची ढेकर आल्यावर 'हा बाळाचा' म्हणून एक लाडू हळूच त्यांच्या पानांत टाकीन.'

पण हे तिचे मनोरथ सफळ व्हायचे नव्हते. बारशाच्या दिवशीं माहेरचा अहेर आला, बाळलेणेंहि आलें, पण राजाभाऊ मात्र आले नाहींत. पहिल्या वहिल्या मंगलप्रसंगीं तिचा सुधीर भाऊंच्या आशीर्वादांना वंचित झाला. त्या रात्रीं सुधीरला मांडीवर घेऊन सईनें त्याचे गाल ओले केले. भाऊंची कल्पनागम्य मूर्ति पुढें उभी करून तिनें त्यांची करुणा भाकली.

आणखी महिनाभर लोटला अन् तिला एक दिवस आढळून आलें कीं, सुधीरला लघवी करतांना कष्ट पडत आहेत. तो त्या वेळीं घाबरल्यासारखें करतो, क्वचित् किंचाळतोहि. तिनें ती गोष्ट विश्वनाथाच्या निदर्शनास आणली. लगेच डॉक्टरहि आले. ती जागा तपासून त्यांनीं निर्णय दिला. 'लहानशी शस्त्रक्रिया करावी लागेल. तुम्ही त्याला पणजीच्या इस्पितळांत घेऊन चला. तिथल्या शस्त्रवैद्याला मी चिठ्ठी देतों.'

सईच्या पोटांत 'आवरा' उठला. तिची अन्नपाण्यावरची रुचि उडाली. बाळाच्या दृष्टीला दृष्टि लावून ती तासन् तास आंसवें ढाळूं लागली. एवढ्याशा कोवळ्या जारावर शस्त्रक्रिया, ही कल्पनाच तिच्या काळजाचें पाणी करीत होती. 'भाऊंनीं आपल्याकडे पाठ केली आहे, ज्यांनीं आमच्यासाठीं देह कष्टवला, त्यांच्याशींच आपण उलट्या काळजानें वागलों आहों. कसं

होईल आपलं बरं भलं!' हे विचार अन् त्यांच्यामागून उठणाऱ्या अशुभ शंका यांनीं आंतून तिची पोखरणी चालविली होती.

विश्वनाथहि आंतून डळमळला आहे हें त्याचा चेहराच सांगत होता. तो जेव्हां पणजीच्या प्रस्थानाची जुळवाजुळव करूं लागला तेव्हां सईनें त्याला आंत बोलावून सांगितलें,

"माझं एक ऐकणार आहांत का? पणजीला जायच्या आधीं भाऊंना इथें बोलावून आणा. त्यांचे अडीचशें रुपये त्यांना परत करा. आपण दोघं त्यांची क्षमा मागूं. वडील माणसांचा रोष बरा नव्हे. आपला सुधीर बरा झाला पाहिजे. तुमचा सगळा अहंकार आतां बाजूला ठेवा. माझ्या-साठीं नव्हे; तुमच्या लेंकरासाठीं. हें पडलेलं घर त्यांनीं उभं केलं. बाळाचं दुखणंहि त्यांच्या आशीर्वादानं बरं होईल."

बैलानें कान झाडून चिलटाला उडवावें तसे विश्वनाथानें तिचे हिताचे बोल धुत्कारले. तो तिथून निसटूं लागला तेव्हां ती निग्रहाच्या स्वरांत पुनश्च त्याला म्हणाली,

"थांबा, अडीचशें रुपयांसाठीं तुमचा जीव तुटतोय्. पण ते रुपये तुमचे नाहींत. तें माझं स्त्रीधन आहें. तें माझं मला मिळालं पाहिजे. तें घेऊन मी तुमच्या कृतघ्नपणाचं प्रायश्चित्त करणार आहें. हें झालं नाहीं तोंवर मी पणजीला येणार नाहीं. माझ्या काळजाला तेवढा धीरं नाहीं. वाटल्यास तुम्ही बाळाला घेऊन जा. काय करायचें असेल तें करा."

"कशी येत नाहींस तें पाहतों." विश्वनाथ नेहमींच्या गुर्मींत बोलून गेला.

"मला नेण्याचं सामर्थ्य तुमच्या अंगांत नाहीं. प्रचीति पाहावयाची असेल तर अवश्य पाहा."

विश्वनाथ गोंधळला. विचार करतां करतां त्याला असा प्रश्न पडला कीं, 'हिनें येण्याचें नाकारलें तर हिला मोटारींत घालायची कशी? बखोटीला धरून ओढीत न्यायची, का उचलून? म्हणजे भर बाजारांत चांगलीच शोभा होईल आपली! अन् समजा, हिला टाकून एकट्या सुधीरलाच नेलें तर—लोक चांगलेंच शेण घालतील आपल्या तोंडांत. शिवाय तें तान्हें पोर भुकेनें कळवळलें म्हणजे—एकूण आपली अब्रू जाण्याचा प्रसंग येऊन ठेपला आहे.

सईला कशी वळवायची ही एक समस्याच त्याच्या पुढें उभी राहिली. युक्तिवादाच्या दृष्टीनें तो स्वतः लंगडा होता. त्याचा शक्तिवाद सई झुगारून द्यायला निघाली होती. भक्तिवादाची तर त्याला तोंडओळखसुद्धां नव्हती. अशीं माणसें अशा प्रसंगीं गांगरलीं नाहींत तरच नवल. पण असा सुखासुखी पराभव कबूल करायला त्याचा दुराग्रही आत्मा तयार होईना.

विश्वनाथानें त्या दिवशीं जिवाचा तडफडाट केला. भांड्यांना पोचे आणले. वाढलेल्या अन्नाचा पेरा केला. कपबशा पायांनीं लाथाडल्या. डोळ्यांतून ठिणग्या सोडीत आवाज चढवले. आग्या वेताळ दाखवून तो सईला घाबरवूं पाहात होता.

पण हीं सगळीं शस्त्रें अन् अस्त्रें गिळून सई अभेद्य, अभंग राहिली. तिनें प्रतिवाद केला नाहीं अन् आपला निश्चयहि ढळूं दिला नाहीं. सारी रात्र तळमळून विश्वनाथाला सकाळीं दुकानाची फळी उघण्यापूर्वीं अडीच-शेंच्या नोटा सईपुढें ठेवाव्या लागल्या.

" कर तुला काय करायचं असेल तें ! अन् आतां तरी माझा छळवाद मांडूं नकोस ! "

सईनें लागलीच एक गडी बोलावला अन् त्याच्या हातीं राजाभाऊंना चिठ्ठी दिली—

" भाऊ,

तुमचा नातू आजारी आहे. पणजीला नेऊन त्याच्यावर शस्त्रक्रिया करावी लागणार आहे. आमचे सगळे अपराध पोटांत घालून या प्रसंगीं धांवून या. डोळ्यांत प्राण आणून तुमची वाट पाहातें.

तुमची,

सई."

पितापुत्रींची ती भेट दगडालाहि पाझर फोडणारी होती. राजाभाऊंच्या गळां मिठी घालून सई फुलून फुलून रडत होती. तिची पाठ कुरवाळतांना राजाभाऊंचाहि तिच्या मस्तकावर अभिषेक चालला होता. तो अमृताचा घडा फिरून सईच्या हातीं आला होता. अश्रूंच्या गर्दीपुढें दोघांच्याहि वाणीला

अवसर नव्हता. विश्वनाथाला त्या खोलींत जाण्याचें धैर्य झालें नाहीं. तो बाहेरच्या बाजूला चोरासारखा उभा होता. आपली बायको आतां सासऱ्या-पुढें आपल्याविषयीं कसलें गरळ ओकते तें तो निथूनच ऐकणार होता.

" भाऊ, एवढे कसे हो निष्ठुर झालांत तुम्ही ! आमच्यासाठीं राहूं दे; पण बाळासाठींसुद्धां तुम्हांला यावंसं वाटलं नाहीं ना ? "

" नाहीं वाटलं. त्या प्रसंगीं तुम्ही माझ्यावर जो आडून घाव घातलांत तो अजून बुजला नव्हता पोरी ! जळता जीव घेऊन बाळाजवळ कसं यायचं ? काय त्यांत सुख होतं तुम्हांला अन् मला—? "

" यांत त्यांचा कांहीं दोष नाहीं भाऊ. तो सर्वस्वीं माझाच अपराध होता. माझीच बुद्धि चळली. मीच स्वार्थाला जुडलें. मींच कृतघ्न होऊन तुम्हांला गोत्यांत आणलं. पण गेले चार-पांच महिने मला त्याचं पुरं पुरं शासन मिळालं आहे. भाऊ, हे तुमचे ते अडीचशें रुपये. हे तुम्ही ठेवा अन् चुकलेल्या लेंकराला पदरांत घ्या. पुन्हां तुमच्या सईला अशी दुर्बुद्धि कधींहि न होवो—" सईनें आणखी एकदां राजाभाऊंच्या छातींत तोंड खुपसलें. पुन्हां अधिकच घट्ट मिठी बसली.

" सये, पोरी ! मी अडीचशें रुपयांना का रडत होतों ? छट् ! मला दुःख होत होतं तें माझ्या सुंदर, सुगंधी जुईच्या फुलाला कीड लागली त्याचं. तुझं अंतःकरण निवळलं यांतच माझी सगळी हानि भरून आली. हे अडीचशें रुपये तूं परत दिलेस म्हणून मी का ते नेणार आहें ? अग, आतां त्यांना नवा हक्कदार आला आहे. पणजीला त्याची शस्त्रक्रिया होऊन तो बरा झाला कीं मी, त्याला सोन्याच्या मनगट्या करणार आहें अन् त्याला घेऊन सरळ घरीं जाणार आहें. त्याची आजी बसली आहे ना तिथें वाटेला डोळे लावून ! "

आणि राजाभाऊंची दृष्टि पाळण्याकडे गेली. तिथें खुसुमुसु चाललें होतें. नाजूक बोटांचीं आरक्त पदतलें पाळण्याच्या कठड्यावर मऊ मऊ आघात करीत होतीं. राजाभाऊ म्हणाले,

" जागी आहे वाटतं स्वारी ! थांब हं, मी वाटेतिटेचा आलों आहें. आधीं विहिरीवर जाऊन पाय धुऊन येतों ! "

राजाभाऊ उठून बाहेर आले अन् तडक परसांत गेले. पाठोपाठ दबल्या पावलांनीं विश्वनाथ त्या खोलींत शिरला. सई उठून उभी राहिली. तिचें मन फुलासारखें हलकें झालें होतें. तिच्या नयनांत प्रसन्नता खेळत होती. विश्वनाथ तिच्याकडे स्थिर दृष्टीनें पाहूं लागला. ती कृपामयी नवमाता त्याला निराळीच, अपूर्व अशी दिसली. त्यानें स्निग्ध, कंपित स्वरांत तिला हांक मारली, ' सईऽ ! ' त्याच्या नेत्रांत सईला कारुण्य दिसलें. तो तेवढ्यावरच थांबला नाहीं.

" सर्वांत मला तूं हा धक्का अनपेक्षित दिलास. माझा अपराध तूं कां बरं आपल्या शिरावर ओढून घेतलास ? भाऊंना कां फसवलंस ? तूं सत्य लपवलंस तरी मी तें त्यांच्यापाशीं आतां उघड करीन. ज्यांनीं तुला क्षमा केली, ते मला करणार नाहींत का ? "

" शप्पथ आहे माझ्या गळ्याची, असं कांहीं कराल तर— ! " सई उत्तेजित होऊन म्हणाली.

त्याच क्षणीं दोघांचीहि नजर दरवाजाकडे वळली. भाऊ तिथें उभे होते ' अन् सगळं मला कळलं. ' असा भाव त्यांच्या मुद्रेवर हंसत होता.



# येरे माझ्या मागल्या

८

आमच्या शेजारची बयामावशी म्हणजे अत्यंत संसारदक्ष बाई. दिवसाचें वेळापत्रक जसें तिचें ठरलेलें होतें तसेच वर्षाच्या बारा महिन्यांचे कार्यक्रमहि तिनें बांधून टाकलेले होते. प्रतिवार्षिक सगळ्या कामांत तिची आघाडी असायची. लोकांची सुपारी काढून होतेच आहे; तर ही कुळागराला शिंपणें घालून मोकळी. सगळ्या गांवांत पहिली ' गोठा-शाकारणी ' तिची. मृगाचा पहिला पाऊस पडायच्या आंत हिच्या घरांत भाताच्या मुड्या एकीवर एक उभारल्या जायच्या. तिच्या सगळ्याच गोष्टी माफक अन् शिस्तवार असायच्या.

कार्तिकानें पाठ फिरवतांच एका रात्रीं तिनें भालूला सांगितलें, " उद्यां-पासून आठ दिवस रानांतून गवत कापून आणायचं बरं का. शेजारचा चिंतू येईल तुझ्या सोबतीला. " भालूनें ' बरं आई ' म्हटलें अन् तो झोंपीं गेला. सकाळीं उठतो तों त्याच्यासाठीं आंघोळीचें पाणी तापून तयार होतें अन् घरांतल्या चुलीवर ' आटवल ' रटरटत होतें.

गंधाचा दुबोटी नाम लावून भालू तूपमेतकुटासह पानभर आटवल जेवला. दुहेरी नागपुरी धोतराची खोळ करून त्यानें आपल्या डोक्यावर ठेवली. ज्या दोरीनें तो गवताचा भारा बांधून आणणार होता तीच दोरी त्यानें डोक्याभोंवतीं खोळेवरून गुंडाळली. कडाशीची लखलखीत दात्री कोयती खस्कन ओढून कमरेला खोचली. दोन वर्षांचा त्याचा छोकरा मधू ' मी येनाल भूल ' म्हणून पायाला बिलगला होता त्याची मिठी हळूच सोडवली. आणि पत्नीनें पुढें केलेली पेजेची शिंकाळी तिच्यावर एक हंसरा दृष्टिपात टाकून अलगद डोक्यावर ठेवून तो बाहेर पडला.

" दुपारच्या वेळीं एखाद्या झाडाखालीं विसांवा घ्या; उगाच उन्हांत

करपूं नका ! " बयामावशी मागच्या अंगणांत सुपारी पातळतांना मोय्यांदा त्याला म्हणाली तें मीं माझ्या घरांतून ऐकलें.

मीहि तयारच होतों. आम्ही दोघे लगेच जायला निघालों. थोडें पुढें जातों तों खांद्याला ' खाडूं ' अन् वर लांब लवलवती बांबूची काठी या सरंजामानिशीं आमचा पाडपी सामोरा आला. माझ्या ठिकाणांतली सुपारी पाडायला तो आला होता. अन् त्या दिवशीं जर त्याला हातचें सोडलें असतें तर पुढें पंधरा दिवस तरी त्याचें दर्शन होणें मुष्कील होतें. ' दिवाणचें तेल पदरांत घ्यावें ' या हिशेबानें मी माघारा फिरलों अन् एकटा जाऊं नको म्हणत असतांना भालू पुढें सटकला.

बयामावशीला हें समजलें तेव्हां ती कावल्यासारखी झाली. मी माझ्या उद्योगाला लागलों. अन् तो उद्योग मला दुपारीं तीन वाजेपर्यंत पुरला. हिरव्या, पिक्या शिपट्यांच्या वेगवेगळया चाक्या डाळून मी मोकळा होतों न होतों तोंच कोणी तरी कुळवाडीण आरडत, आक्रंदत बयामावशीच्या दारांत आल्याचें मीं ऐकलें. मी विडीचें ' पोंत ' तसेंच टाकून तिकडे धांवलों.

कुळवाडीण तरणीताठी होती तरी तिला चांगलीच धाप लागली होती. तिची चोळी घामानें थबथबून दंडांना चिकटली होती. केसांनीं बंधन झुगारून दिलें होतें. तिची उभार आंगलट थरथर कांपत होती आणि भयानें तिच्या काळजाचें जें पाणी झालें होतें तेंच जणूं तिच्या डोळ्यांतून गालांवर सांडत होतें.

" धांव गे बाये बयामावशीऽऽ... तुझो पुत—" हे शब्द तिनें असा चमत्कारिक हेल काढून उच्चारले कीं बयामावशीचा सगळा जीव कानांत गोळा झाला.

आणि नंतर तिनें जी हकीगत सांगितली ती जितकी अकल्पित होती तितकीच भयानक होती !

गोमंतकांतलें राण्यांचें बंड थोड्याच दिवसापूर्वी मोडलें होतें. पण शिमगा संपला तरी कवित्व मागाहून उरावें तसें बंड मोडण्यासाठीं गोवासरकारनें जे आफ्रिकेंतले शिद्दी मुद्दाम आणले होते अन् निरनिराळ्या चौक्यांवर ठेवले होते, त्यांचा अजून उठावा झाला नव्हता. ते अधूनमधून सार्जेंटाचा डोळा

चुकवून ठाण्यावरून पसार होत अन् आजूबाजूच्या गांवांत अन् शेतांत शिरून लोकांना त्रास देत. त्या सडया फटिंगांचा विशेषतः बायकांवर डोळा होता.

ती कुळवाडीण त्या दिवशीं डोंगरी शेतांतल्या खळ्यावरचे नाचणे आणायला चालली होती. सोबतीला एक बाप्या होता. वाट रानांतली, आशींपाशीं कोणी नाहीं, अशा संधींत एका मोकाट शिद्द्यानें तिला गांठलें. त्याला पाहतांच त्या बाप्यानें तिला सोडून खालच्या घळींत जीव घातला अन् तो पसार झाला. शिद्द्याला अगदीं आयतें खाजें मिळालें. कमरेचें सोडून फेकून देऊन त्यानें तिचा हात धरला. ती जिवाच्या आकांताला एकदां मोठ्यानें ओरडली.

भालू जवळच गवत कापीत होता. त्याच्या कानीं ती आरोळी गेली. एखादी बाई भिवस्या वाघाला भिऊन कांहीं इतकी ओरडणार नाहीं, तिला एखादा शिद्दीच भेटला असावा असें भालूला वाटलें. कारण असे कांहीं प्रकार त्याच्या कानांवर आले होते. त्याच्या अंगांतलें रक्त सळसळलें. हातांतली गवताची मूठ तशीच वाऱ्यावर उडवून तो झेपावला.

भालूचे पाय तिथें पोंचतात तों त्या शिद्द्यानें तिला आडवी घातली होती. वृक्ष-पाषाणांच्या साक्षीनें तो काळा राक्षस पापकर्माला सरसावला होता. त्याला इतर जगाचें भान नव्हतें; कसली शंकाहि नव्हती. अशा स्थितींत भालूनें जवळचाच एक 'होंडका' उचलला अन् उभाच्या उभा त्याच्या तुळतुळीत खोलगट पाठींत हाणला. तो रेकल्यासारखा आवाज काढून बाजूला कलंडला. इतक्यांत ती कुळवाडीण उठली अन् तिनें आपली लाज सावरली.

शिद्द्यानें दोन्ही हातांनीं कपाळ दाबून सणक जिरवली. भरल्या ताटा-वरून लाथ मारून उठवणारा आपला शत्रु कोण हें त्यानें पाहिलें. त्याच्या बटबटीत डोळ्यांत सूडाची आग भिनली. त्याचा तांबडा पण बाहेरच्या बाजूनें ओथंबलेला खालचा ओठ लळलळूं लागला. आपला आडमाप दिगंबर देह उभा करून त्या काळ्यारोम डुकरानें भालूवर मुसंडी मारली.

भालूच्या डोळ्यांतहि रक्त उतरलें होतें. 'चल पळ रे माझ्या भावाऽऽ' म्हणून ती कुळवाडीण ओरडत होती तरी तें भालूनें जुमानलें नाहीं. त्याच्या धडकेला यानेंहि प्रतिधडक दिली. दोघे एकमेकांच्या काठ्याला खिळले.

भालू दांडगा नव्हता; पण चिवट होता. तरी पण शिद्द्याच्या वज्रमुष्टीचा ठोसा जेव्हां काळजांतच बसला तेव्हां तो उताणा आदळला.

पुढें काय झालें तें बघायला ती कुळवाडीण थांबली नाहीं. पिशाच्चा-सारखी सैराट पळत तिनें बयामावशीचें घर गांठलें.

आणि तिनें सांगितलेली ती हकीगत ऐकून बयामावशीनें कपाळावर हात मारून घेतला. भालूच्या बायकोचें काळीज उपडें पडलें. मीं लगेच धांवा-धांव करून चार शेजारी गोळा केले, जातां जातां दिसले ते चार चौघे कुळवाडीहि थांबवून घेतले आणि त्या कुळवाडणीला म्हटलें,

" चल आमच्याबरोबर आम्हांला ती जागा दाखवायला. "

आम्ही निघालेले पाहातांच बयामावशीहि आमच्याबरोबर निघाली, " तूं घरींच थांब, आम्ही भालूला ताबडतोब घेऊन येतों. " आमच्यापैकीं एक-जण तिला म्हणाला. मींहि पण त्याच्या बोलण्याला पुष्टि दिली. पण—

" मला कसं रे घरीं राहवेल ? " या तिच्या केविलवाण्या प्रश्नाला आम्ही काय उत्तर देणार ? आपल्या लटपटत्या पायांना आधार म्हणून हातांत काठी घेऊन ती पुढें झाली. एक पाऊल पुढें अन् काठीचा 'खट्ट' आवाज, अशा द्रुतगतीनें आजूबाजूला न पाहतां ती वाट कापूं लागली. ती कोणाशींहि बोलत नव्हती; पण तिच्या अंतरांत खवळलेलें काहूर तिच्या डोळ्यांत दिसत होतें. डाचणाऱ्या अभद्र शंका तिच्या मुद्रेवर वाचतां येत होत्या.

" म्हातारीच्या अदृष्टांत काय काय लिहिलें आहे देव जाणे ! " एकजण हळूच माझ्या कानाशीं कुजबुजला. पण मीं त्याला खुणेनेंच ' चूप ' म्हटलें. तब्बल पाऊण तासानें आम्ही त्या ठिकाणावर पोंचलों. भालूनें त्या दिवशीं गवत कापलें होतें ती जागा प्रथम आम्हांला दिसली. त्यानें कापलेल्या त्या तृणमुष्टि जमिनीसरपट पडल्या होत्या. आणि त्यांतल्या कांहीं काडया वाऱ्यानें वर उडून उभ्या गवताच्या डोक्यावर आडव्या झाल्या होत्या.

" अगदीं जवळ पोंचलों आतां. " ती कुळवाडीण म्हणाली अन् एक पाऊल मागेंच सरकली. आम्हीं तिथूनच भालूला मोठमोठ्यांदा साद घातली. कुठून प्रत्युत्तर येतें का म्हणून कान टवकारून ऐकूं लागलों; पण एका

पांखराच्या 'भिर्र्' आवाजाशिवाय आम्हांला दुसरें कांहींच ऐकूं आलें नाहीं. अधिऱ्या उत्सुकतेनें चौफेर दृष्टि टाकीत आम्ही पुढेंपुढें जाऊं लागलों.

या वेळीं पांच वाजून गेले होते. सोनेरी सूर्यकिरण झाडांच्या शेंड्यांवर चढत होते अन् संध्याछाया तळीं उतरत होत्या. वानरमंडळी आपापले आश्रयवृक्ष पटकावीत होती. पांखरांचें एक भलें मोठें थिरें निळ्या अवकांशांत भरारत मुक्कामाला निघालें होतें. माझी नजर पश्चिमेकडे गेली. तिकडल्या पर्वतश्रेणीनें डोक्यावर घेतलेला 'सोन्याचा कलश' आडव्या आलेल्या सावळ्या मेघरेखेनें तडकल्यागत दिसत होता.

आम्ही त्या उत्पाताच्या ठिकाणीं पोंचलों मात्र; जवळच्या एका ढोलींतून एका घुबडानें डोकें बाहेर काढलें अन् 'घु घूऽऽघु' असा काळीज कापणारा शब्द काढला. जणूं तो काळदूत आम्हांला म्हणत होता—

'तुम्ही आलांत खरे; पण फार उशीर केलांत!'

× × ×

दुसऱ्या दिवशीं सकाळची वेळ. बयामावशीच्या घरांतला सूर्य मावळला असला तरी विश्वांतला सूर्य कालच्याप्रमाणेंच उगवला होता. भालूच्या बायकोनें आंतल्या बाजूला एका जुनेरावर पासल घेतली होती. बयामावशी ओटीवर बसली होती. शेजारचीं चार माणसें तिच्या आवतींभोंवतीं जमलीं होतीं. म्हातारी रडत नव्हती किंवा आक्रोशतहि नव्हती आणि म्हणूनच तिची मुद्रा विलक्षण भकास दिसत होती. मला वाटलें ही जर घळघळून रडेल तर किती चांगलें होईल! तिच्या सुकलेल्या चर्येला सहजपणें ओलावा मिळेल अन् आंतला आगडोंबहि थोडासा विझेल.

कांहीं कांहीं नातवंडांना आजी म्हणजे परब्रह्म असतें. त्या घरांतला दोन वर्षांचा मधूहि त्याच जातींतला होता. क्षणभरहि तो आजीला विसंबत नसे. या वेळींहि तो तिच्या गुडघ्यांना मिठी मारून बसला होता. गंभीर चेहरे करून बसलेल्या लोकांकडे सशाच्या नजरेनें तो पाहात होता अन् मध्येंच मान उंचावून आजीच्या मुखमुद्रेकडे नेत्रदलें स्थिर करीत होता.

पण आज तिचे त्याला कुरवाळणारे हात लांकडें झाले होते अन् कौतुकाच्या बोलांचीं फुलें उधळणारे तिचे ओठ मुके बनले होते. डोळ्यांत

मायेचा उन्हाळा कडकला होता. त्या अजाण जिवाला तें सहन झालें नाहीं. त्यानें उभें राहून आजीचे बसके गाल आपल्या दोन्ही हातांनीं दाबून धरले, तिचें तोंड सन्मुख केलें आणि म्हटलें,

" आजी, पापा घे ! "

आणि तिनें ओठ पुढें करण्याची वाट न बघतां त्यानेंच आपला मऊ, गुलाबी गाल तिच्या ओठांवर घट्ट दाबला.

लेंकराच्या मायेचा तो साक्षात्कार पाहून जवळ बसलेली एक शेजारीण बयामावशीला म्हणाली,

" आतां याच्याकडे पाहून तूं दुःखाला आवर घाल. आहे तुझ्या वंशाला कोंभ– "

त्यावर बयामावशी कडूकडू हंसली. तिनें मनांत म्हटलें, पंचवीस वर्षांपूर्वीं जेव्हां आपलें कुंकू पुसलें गेलें तेव्हां रांगत्या बाळाकडे पाहून शेजारच्या बायका हेच शब्द बोलल्या होत्या. 'आहे तुझ्या वंशाला कोंभ– '

आणि तिच्या जीवनाच्या मध्यकालांतलें तें रोमहर्षण पर्व तिला समग्र आठवलें. त्या वेळीं दादा राण्याचें बंड ऐन भरांत होतें. बंडवाले अनावरपणें धुडगूस घालीत होते. फिरंगी लष्कर त्यांना पकडण्यासाठीं रात्रीच्या वेळीं ' ठिकाणदारां 'चीं घरें धुंडीत होतें. एक दिवस तिच्याहि घरावर धाड आली होती. पाखल्यांची एक तुकडी तिच्या घरांत घुसली होती. ते लोक घर तपासून जेव्हां स्वैंपाकघरांत शिरूं लागलें तेव्हां तिच्या नवऱ्यानें दार धरलें होतें. थोडासा अतिप्रसंगहि केला होता. त्या रागानें ते लोक त्याला धरून घेऊन गेले होते. कुठल्या तरी एका ठाण्यावर उपाशी ठेवून त्यांनीं त्याचा छळ केला होता. नंतर एका रात्रीं पहारेकऱ्यांच्या हातावर तुरी देऊन तो पळाला होता. सूडाच्या भावनेनें धगधगत त्यानें दादा राण्याची भेट घेतली होती. तो एक कडवा बंडवाला होऊन अन् राण्यानें दिलेली बंदूक खांद्यावर टाकून अपरात्रीं घरीं आला होता. बयामावशीनें त्याला त्या साहसकर्मापासून परावृत्त करण्याचा जीव तोडून प्रयत्न केला होता; पण त्यांत तिला यश आलें नव्हतें. आणि नंतर एक-दोन महिन्यांनीं फिरंगी लष्कर अन् बंडवाले यांची जी एक समोरासमोर चकमक झडली त्यांत तो कामीं आला होता...

भालू त्या वेळीं अवघा आठ महिन्यांचा होता. पण आपल्या दुःखामुळें त्याचें भवितव्य काळवंडूं नये म्हणून ती सगळें पिऊन पचवून उभी राहिली होती. ती स्वभावतःच सत्त्वधीर अन् शहाणी होती. त्यामुळें हातीं आलेलीं संसाराचीं सूत्रें तिनें कुशलतेनें खेळविलीं होतीं. तिनें मुलाबरोबरच उत्पन्नहि वाढविलें होतें. ती कोणाला आपल्या जमाखर्चाचा गम लागूं देत नव्हती; पण शेजारी म्हणत होते कीं " बयामावशीच्या घरांत 'हळदीचें खांदळ' आहे."

भालू म्हणजे तिचा बहिश्चर प्राण होता. जळीं, स्थळीं, काष्ठीं, पाषाणीं ती त्याला जपत होती. त्याच्या अवखळपणाला पदोपदीं दाबीत होती. त्याच्या साहसी वृत्तीचें शब्दानेंच काय, दृष्टीनेंसुद्धां तिनें कधीं कौतुक केलें नाहीं. तिला आपल्या घरांत इतिहासाची पुनरावृत्ति व्हायला नको होती.

पण भालूच्या नसेनसेंत त्याच बापाचें रक्त खेळत होतें. त्याला तो काय करणार? आईच्या समोर 'दास मारुती' दिसणारा भालू तिच्या नजरेबाहेर जातांच 'वीर मारुती' बने. पोफळीच्या शेंड्यापर्यंत चढून घोसदार शिपटें तोडायचें अन् तें दांतांत धरून सर्र्‌दिशीं भुईवर यायचें. आपले नाहीं, तर निदान दुसऱ्याचे तरी माड पाडून द्यायचे. गुरें घेऊन माळावर गेला कीं एखाद्या मारक्या खोंडाची हळूच शेपटी पिळायची आणि तो फुंफाटत अंगावर आला कीं शिंगें पकडून त्याला मागें रेटायचा प्रयत्न करायचा. अशा त्याच्या लीला चालत. असे दहा प्रकार घडले कीं एखादातरी बयामावशीच्या कानांवर जाई आणि ती मग त्याला धारेवर धरी. त्याच्या रागानें उपाशीसुद्धां राही! पण भालूच्या कानीं आपलें तुळशीपत्र!

त्याचा एक गुण मात्र वाखाणण्यासारखा होता. आईनें सांगितलेलें घरप्रपंचाचें काम तो बिनबोभाट करी. 'पडेल तें काम अन् मिळेल तो मुशाहिरा' याच पद्धतीनें तो वाढला होता. आतां तो एका मुलाचा बाप झाला होता तरी त्यानें संसाराचा याहून अधिक भार कधींच घेतला नव्हता. 'बरं आहे आई सगळं पाहते तें' असेंच तो म्हणे. आणि 'इतका वागला तरी पुष्कळ आहे' असें म्हणून बयामावशीहि समाधान मानून घेई.

पण आज त्यानें पुरताच दगा दिला! तिच्या काळजाचे तिळातिळाएवढे तुकडे करून तो पसार झाला होता. फिरून तीच कथा मूळपदावर

आली होती. त्या वेळीं नवरा गेला म्हणून अन् आज मुलगा गेला म्हणून! त्या वेळीं तिच्या देहांत कस तरी होता. आज फक्त तिचीं मूठभर हाडें शिल्लक उरलीं होतीं.

दिवसामागून दिवस लोटूं लागले. अकरा, बारा पार पडले. तेराव्या दिवशीं ब्राह्मणांनीं तिच्या घरांत 'उदकशांति' म्हटली. चौदाव्या दिवशीं सकाळीं तिनें मला हांक मारली. मी तिच्यासमोर हजर झालों. बयामावशीनें चारदोन पातळें, पांघरुणें, एक तांब्या-भांडें, दोन हलक्याशा पातेल्या अन् कांहीं पुरचुंड्या एकत्र केल्या होत्या अन् ती त्यांचें गाठोळें बांधीत होती. सून दाराआडून स्फुंदत होती. मला तो प्रकार चमत्कारिक वाटला म्हणून मीं विचारलें,

"हें काय बयामावशी?"

"ही महायात्रेची तयारी!"

"म्हणजे?"

'विश्वनाथ जगाचा पिता, अन्नपूर्णा सर्वांची माता
धुंडिराज सख्खा भाऊ, चल मना काशिला जाऊं।'

मी चाललें काशीयात्रेला. आतां परत येणं नाहीं. उरलेले आयुष्याचे दिवस आतां विश्वेश्वराच्या सान्निध्यांत काढायचे अन् शेवटीं हीं हाडं गंगेंत टाकायचीं. सुनेला संसारांतल्या सगळ्या गोष्टी सांगितल्या आहेत. जें होतं तें तिच्या हवालीं केलं आहे. जें येणं आहे त्याचा हिशेब सांगितला आहे. याउप्पर ती, तिचा मुलगा अन् त्यांचं नशीब. तूं आमचा शेजारी. प्रसंग पडला तर तिच्या हांकेला 'ओ' दे, एवढंच तुला सांगणं."

मी खुंभासारखा दाराच्या चौकटीला धरून उभा राहिलों. बयामावशी जाणार म्हणून मलाहि कसेसेंच वाटलें. बयामावशी म्हणजे आमच्या संसारालासुद्धां एक धीराची ढिगी होती. पण तिला थोपवून धरणें माझ्या शक्तीच्या बाहेरचें होतें. ती जाणार म्हणजे जाणार, हें निश्चित होतें.

गांठोळ्याला शेवटची गांठ मारून होतांच ती उठली. एवढा वेळ पाठीवर लोळणाऱ्या मधूला उचलून ती देवापुढें गेली. तिच्या मनांतून त्याला देवापुढें

' दंडवत ' घालायला लावायचें होतें. पण तो कांहीं केल्या भुईला डोकें टेकीना ! अखेर त्याचे दोन्ही हात जोडून ती देवघरांतल्या शाळिग्रामाला म्हणाली,

" लेकरूं तुझ्या पायांवर घातलं आहे. यथेच्छसि तथा कुरु. "

आणि लगेच तिनें ओचा-पदर आवरला. तें गांठोळें उचलून कडेवर घेतलें. अनवाणी पायांनीं ती पायऱ्या उतरली. तुळशीवृंदावनाला उजवी घालून तिनें अंगण सोडलें. खळाळत्या पाटांतून पलीकडे जातांना तिनें दुस्तर मायानदीहि ओलांडली.

बिनबांगड्यांच्या हातांनीं तिनें उभारलेला तो प्रपंच; तें जमवलेलें ' उखळ, मुसळ, जातें—'त्यांत गुंतलेले जिवाचे धागे काढून घेतांना तिला होणारे कष्ट तिच्या मुखावरच्या प्रत्येक रेषेंत दिसत होते. पण आज प्रवृत्ति-निवृत्तींच्या सनातन झगड्यांत निवृत्ति विजयी झाली होती.

पांढरेंशुभ्र पातळ, वर पांढरी पांघरायची चौघडी अन् काखेचें गांठोळेंहि शुभ्र पांढरें अशा वेषांत ती घर अन् गांव सोडीत होती. जणूं आमच्या गांवची निर्मळ भागीरथीच. ज्या केळी-पोफळींच्या छायेंतून ती कुळागराचे ओटे उतरत होती, तीं झाडें तिनें स्वहस्तें लावलीं होतीं अन् शिंपून वाढवलीं होतीं. तीं आपलीं पानें हालवून बयामावशीला ' जा ' म्हणत होतीं का ' जाऊं नको ' म्हणत होतीं तें मी काय सांगणार ?

मी ओढ्यापर्यंत तिला पोंचवायला गेलों. पलीकडे जी चढण होती तिच्या माथ्यावर चढून जाईपर्यंत मी तिच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पाहात राहिलों आणि तिथें विस्तारलेल्या कर्मलीच्या झाडापलीकडे जाऊन ती जेव्हां दिसेनाशी झाली, तेव्हां विषण्ण मनानें माझ्या कुळागराकडे वळलों.

पंधरा दिवस निघून गेले; पण काशीला सुखरूप पोंचल्याचें बोटभर पत्रसुद्धां बयामावशीकडून आलें नाहीं. सून अगतिक झाली होती, भांबावली होती. मधूनें आजीचा ध्यास घेतला होता. बाप मरून तो पोरका झाला नव्हता तर आजी जाऊन ! ' आजीला घेऊन ये ना ले काका !' म्हणून मी भेटेन त्या त्या वेळीं तो मला सांगे अन् वेगवेगळ्या असत्यांचा आश्रय करून त्या अजाण बालकाची फसवणूक करतांना माझ्या जिवाला कट्यार लागे.

संक्रान्त तोंडावर आली. वायंगणें पेरण्याची घाई सुरू झाली. वर्षाला सगळ्यांच्या आधीं बयामावशीच्या शेताची पेरणी व्हायची. पण यंदां खंड-

करी सुनेजवळ बियाचे पैसे मागूं लागला. वस्तुतः तशी बोली नव्हती किंवा पद्धतहि नव्हती. पण तो कोपरानें खणायला बघत होता.

" तुला शेत करायचं नसलं तर सोडून दे, मी दुसरा खंडकरी लावीन." असें सुनेनें म्हटलें मात्र; तो ' तीन माड ' उडला.

" मियां केल्ल्या शेतांत जोत बांधूंक कोणाच्या काळजाक केंस फुटल्यात ते बगतलंय " असें म्हणून त्यानें छाती पिटली. हीच बयामावशी असती तर त्याची माय व्याली नव्हती भलतंसलतं बोलायला. खेडेगांवांतले प्रपंच लहान असले तरी विळख्यांचे असतात. प्रत्येकजण खोडा घालायला अन् स्वार्थ साधायला टपलेला असतो. बयामावशी या सर्व कुटिल वृत्तींना पुरून उरली होती. सुनेंत तो दम नव्हता अन् येण्याची आशाहि नव्हती.

त्या दिवशीं कुळागरांत चुडतें गोळा करतांना याच गोष्टीचा मी विचार करीत होतों. उशीर झाला होता अन् दक्षिणायनाच्या उन्हाची तिरीप असह्य होऊं लागली होती म्हणून चुडतांचे ' पेंड ' बांधायचें काम मी घाईघाईनें उरकीत होतों. इतक्यांत पाठीमागून ' हुश्श ऽ ! ' असा शब्द अन् धप्पकन् कांहीं तरी टाकल्याचा आवाज माझ्या कानांवर आला. मी मागें वळून पाहिलें अन् माझा विश्वासच बसेना डोळ्यांवर.

ती बयामावशी होती.

" तूं आलीस ! " मी आश्चर्यानें उद्गारलों.

" हो बाबा, आलें. " तिनें पदराच्या टोकानें आपला गळा पुशीत म्हटलें. ती अगदीं गळून गेली होती. पूर्वींपेक्षांहि ती कृश अन् निस्तेज होऊन आली होती. तिच्या खोल गेलेल्या डोळ्यांकडे तर बघवत नव्हतें. लवकर मृत्यु यावा म्हणून कदाचित् यात्राकालांत तिनें घोर देहदंडना केली असावी.

" थांब हं, मी तुला एक अडसर काढून देतों." असं म्हणून मी जवळच्या माडावर चढायला निघालों.

" नको बाबा मला अडसर. अजून माझं आंगधुणं व्हायचं आहे." तिनें मला मोडता घातला.

" बरं झालं तूं आलीस तें ! " मीं म्हटलें.

" बरं काय अन् वाईट काय ! गेलें होतें सगळं मागें टाकून. पण गंगेच्या तीरावर देह ठेवायला तरी पुण्याई नको का ? "

" काय झालं असं ? "

" मी काशीला गेलें. गंगेचं स्नान केलं. विश्वेश्वराचं दर्शनं घेतलं. जिवाचं आर्त पुरलं. सगळीं दुःखं अन् सळं विसरून गेलें. अनेक देशांचे लोक तिथें आले होते; अनेक भाषा बोलत होते. मला त्यांतलं कांहीं कळत नव्हतं. कळत होता तो फक्त ' जय काशी-विश्वनाथ ! ' एवढा जयघोष. मी त्या नादांत तन्मय झालें. माझा अंतर्यामी हृष्टपुष्ट झाला. तिथें जो अमृताभिषेक चालू होता, तो शिवलिंगावर नव्हे; तर त्रिविध तापांनीं आहाळलेल्या माझ्या हृदयावर, असंच मला वाटलं.

रात्रीची आरती झाल्यावर मी मोठ्या कष्टानं तिथून उठलें अन् उपाध्याच्या घरीं आलें. फराळ करून एका कोपऱ्यांत गुरंगुटी केली. विश्वेश्वराचा जप करतां करतां केव्हां झोंप लागली तें कळलंसुद्धां नाहीं. मध्यरात्र उलटली असेल नसेल, विश्वेश्वर स्वप्नांत प्रगटला ! त्याच्या हातात त्रिशूळ होता, त्याला मी घाबरलें नाहीं. घाबरलें ती त्याच्या तृतीय नेत्रांतल्या उग्रतेला. "

" जय विश्वेश्वर ! " कसाबसा माझ्या तोंडून शब्द निघाला.

" तुझा विश्वेश्वर काशींत नाहीं; तो तुझ्या घरीं आहे. तुझ्यासाठीं भुकेला आहे. तुला अहोरात्र हांका मारीत राहिला आहे. हातचं सोडून तूं पळत्याच्या पाठीस लागलीस—"

" पण देवा, मी तुझ्या पायांशीं आलें. वाराणशी ही मोक्षदात्री आहे म्हणून पोथींत सांगितलं आहे; म्हणून इथं देह ठेवण्याच्या आशेनं सारे मायापाश तोडून आलें. "

" मायापाश तोडलेस हें ठीक. पण कर्तव्य टाकून पळून आलीस हें नाहीं मला आवडलं. तुला मुक्ति इथं नाहीं; तुझ्या गांवांतच आहे. कर्तव्याचं क्षेत्र हीच प्रत्येकाची काशी अन् तें केल्याचं समाधान हाच मोक्ष. तुझ्यावांचून त्या अर्भकाला कोण वाढवील ? त्याच्या भवितव्याची काळजी कोण वाहील ? त्या बालजीवाचे दोन पूर्वज अन्याय आणि अत्याचार यांच्याशीं

झगडतांना सार्थकीं लागले. काशीला न येतांच मुक्त झाले. त्यांच्या वंशाचा अंकुर तूं करपवून टाकणार आहेस का ? ”

“ माझ्या हृदयांत भडभडून आलें तें या वेळीं. सुकलेले अश्रूंचे झरे जिवस होऊन खळखळूं लागले तेंहि याच वेळीं. मी त्या रुद्रमूर्तीकडे पाहून करुण वाणीनें म्हटलं, ‘ नाहीं, शंभो ! नाहीं. मी त्याचा प्रतिपाळ करीन. दुर्दैवाच्या झळा स्वतः सोसून मी त्यांपासून लेंकराला दूर ठेवीन. ”

“ मग जा परत घरीं. त्याच्या मूर्तींत मला पाहा. त्याच्या शब्दांत माझा नाद ऐक. ”

इतकं बोलून ती मूर्ति अदृश्य झाली. माझी झोंप पार उडाली. रात्रभर मीं त्याच साक्षात्काराचा विचार करीत होतें. देवाच्या मनांत अजून मला कर्मबंधांतून सोडवायचं नाहीं हा निष्कर्ष माझ्या मनानं घेतला. सकाळीं उठून विश्वेश्वराच्या मंदिराचा मार्ग चालायच्या ऐवजीं मी स्टेशनची वाट चालूं लागलें. काशींत तीन रात्री तरी वस्ती करावी हा यात्रानियमहि पाळायचं धैर्य मला झालं नाहीं. आतां इकडचा विश्वेश्वर डोळ्यांपुढें नाचूं लागला आणि आज मी पुनश्च इथं पोंचलें ! ”

बयामावशीनें ही हकीगत सांगून आपले डबडबलेले डोळे पुसून घेतले. मीं तिचें गांठोळें उचलतांच ती माझ्या मागून कुळागराचे ओटे चढूं लागली. दारांतल्या पाटावर पाय धुण्यासाठीं ती थांबली, तेवढ्यांत मीं अंगणांत जाऊन हांक मारली,

“ मधू , अरे मधू , बाहेर ये लवकर, तुझ्या आजीला घेऊन आलों बघ ! ”

मधू घरांत जेवत होता तो दुडदुडत बाहेर आला. ‘ आजी, आजी ’ करीत त्यानें ओसरीच्या पायऱ्या चढणाऱ्या बयामावशीच्या अंगावर झेप टाकली. आणि मघाशीं स्नान झालें नाहीं म्हणून अडसराचें पाणी नाकारणाऱ्या त्याच बयामावशीनें मधूच्या दहीभातानें उष्ट्या झालेल्या तोंडाचा आंबटगोड पापा घेतांना कसलाच विधिनिषेध मानला नाहीं !

● ● ●

# मंगळसूत्र



त्या लहानग्या वाडींत, सभोंवतीं गुरमाच्या दगडांचे ‘ दुर्ग ’ उभारलेल्या त्या घरांत आज विशेष गडबड दिसत होती. घराचे मालक तातोबा यांच्या मुलीचें उद्यां लग्न होतें. आज दुपारीं तिला घरचें ‘ केळवण ’ झालें होतें. जेवायला आणि जेवल्यानंतर पडेल त्या कामाला वाडींतले सगळे शेजारी सहकुटुंब जमले होते.

पाटाकडच्या माडाच्या डोक्यावर आलेला सूर्यनारायण दुपारचे तीन वाजून गेल्याचें सुचवीत होता. बायकांनीं कालचें अपुरें राहिलेलें रुखवताचें साहित्य मागील अंकावरून पुढें चालू केलें होतें. पुरुषांनीं या घरचें तपेलें, त्या घरचा हंडा, अशी भांड्यांची जमवाजमव चालवली होती. तळणाचा वास खालचें कुळागर ओलांडून धांवणें करीत होता. ज्या जात्यांवर कुळवाडणी उद्यांच्या वड्यांचें पीठ दळीत होत्या त्यांची घरघर वरच्या वाटेनें जाणाऱ्या वाटसरांच्याहि कानांवर येत होती.

कुळवाड्यांनीं सकाळपासून खपून अंगणांत मांडव घातला होता. त्याला आंब्याच्या पानांचीं तोरणें लावलीं होतीं आणि आतां ते भरल्या पोटीं उद्यांच्या मोठ्या स्वैंपाकासाठीं जवळच्याच छोट्या मांडवांत चर खणत होते. तातोबा अधूनमधून तेथें येऊन त्यांना सूचना देत होते.

लग्नघरीं सगळ्यांना कामें असलीं तरी वधू रिकामीच असते. तिला कोणी काम सांगत नाहीं. तिनें नटून थटून मिरवावें, मोठ्या माणसांनीं केलेल्या थट्टेनें लाजावें अन् मनाला मानवलेंच तर इकडची काडी तिकडे करावी, एवढीच तिच्याबद्दच सर्वांची अपेक्षा असते.

वाडींतल्या उरल्यासुरल्या बायकासुद्धां आतां जमूं लागल्या होत्या. जी येई ती वधूला विचारी,

" काय ग प्रभे ! कुणासाठीं चाललंय हें सगळं ? ह्या करंज्या, हे मुगाचे लाडू, हे चिरोटे, अं ? "

यावर प्रभा चोरटें हंसून लाजल्याचा अभिनय छान करी. पण लागोपाठ चौघी पांचजणींनीं तोच तो प्रश्न विचारून जेव्हां तिला बेजार केलें तेव्हां तिनें विनयाचें अवगुंठन थोडें बाजूला करून म्हटलें,

" कुणासाठीं सांगूं ? आईच्या जांवयासाठीं. "

जुन्या जमान्यांत वाढलेल्या त्या बायकांना प्रभेचा तो स्पष्टवक्तेपणा रुचला नाहीं. एकीनें तर कढईंत करंजी टाकतांना जिवणी मुरडून ' इश्श ! ' केलें. बाकीच्या जरा चपापल्या. दुसऱ्या एका प्रश्नावर तरी प्रभेला निरुत्तर करतां येईल म्हणून एका चतुरिकेनें फिरून तिला विचारलें.

" आईचा जांवई, तो तुझा कोण ग ? "

" हात्तिच्या ! मेव्हणा. एवढं का मला कळत नाहीं ? "

आणखी एकदां त्या बायका चपापल्या. तिचें तें उत्तर सत्य खरें; पण अनपेक्षित होतें. शहाणपणाचें तर होतेंच होतें. त्यामुळें विषयाला एकदम कलाटणी मिळाली. थट्टेचा ओघ सहजच धाकट्या बहिणीकडे वळला. ' हें ग काय आक्का ? ' म्हणून तिनें नापसंती दर्शविली; पण त्या उत्तरानें जिच्या नाकाला मिरची झोंबली होती, ती खवचटपणें म्हणाली,

" तूं काय बाई, घाटावर राहून शिकलीसवरलेली मुलगी. आम्हांला का बोलण्यांत हार जाणार आहेस ? "

आणि ती गोष्ट खरी होती. प्रभा गेलीं पांच वर्षें बेळगांवला आपल्या चुलत्याकडे राहत होती. मुलीला ' चार अक्षरें ' यावीं या उद्देशानें बापानें तिला तिथें ठेवली होती. या वर्षीं ती मराठी सहावींत होती. आणि बेळगांवांत प्लेगची सांथ पसरल्याचें समजल्यामुळें तातोबा तिला घरीं घेऊन आले होते. ती तिथल्या शाळकरी मैत्रिणींत रमली होती. मराठी सातवी झाल्यावर आपण हायस्कुलांत जावें, खूप शिकावें असे तिचे मनोरथ होते.

पण बेळगांवचा प्लेग थांबून बरेच दिवस झाले तरी बाप तिला परत पाठवायचें मनावर घेईना. त्या बाबतींत तो अल्पसंतुष्ट होता. त्याच्या खेडे-गांवी समजुतीप्रमाणें एवढें शिक्षण म्हणजे ' डोक्यावरून पाणी ' गेलें होतें.

त्या टीचभर गांवांत ' आपली मुलगी सहा बुकें शिकली आहे ' एवढीच गोष्ट त्याला मोठेपणा मिरवायला पुरेशी होती.

प्रभेचा जीव बेळगांवला जाण्यासाठीं रुटमुटत होता. तिनें एक दोन वेळां तातोबांना विचारून पाहिलें; पण त्यांनीं दाद घेतली नाहीं. तातोबा आतां निराळ्याच विचारांत होते. आपल्या ' शिकलेल्या ' मुलीचें यंदां लग्न करून टाकायचें असें त्यांनीं ठरवलें होतें. प्रभेच्या आईला पण तेंच हवें होतें. ' न्हातीधुती ' मुलगी केव्हां एकदां दुसऱ्याच्या हातीं लागेल असें तिला झालें होतें.

सतत महिना दीड महिना जोडे झिजवून त्यांनीं हें स्थळ पक्कें केलें होतें. मुलगा अंजुर्जेतल्या एका ' थळां 'तला होता. त्याचा बाप तिथल्या देवस्थानचा पुजारी होता. एकादष्ण्या, लघुरुद्र करून त्यानें बरीचशी 'माया' जवळ केली होती. मुलगा तलम इस्तरीचे कपडे वापरीत होता, पायघोळ धोतरें नेशीत होता, केसांचा भांग फिरवीत होता, कपाळीं तांबड्या तुक-तुकीत गंधाची बारीक टिकली लावीत होता आणि अष्टौप्रहर विडे चघळीत होता. या गोष्टी बापाच्या भिक्षुकी पेशाला शोभण्यासारख्या नसल्या तरी त्याच्या उत्पन्नाला झेपण्यासारख्या होत्या. पंचवीस वर्षांचें वय म्हणजे बेतांत होतें. एवढा ' टाकम् टिका ' पाहिल्यावर शिक्षणाविषयीं प्रश्न विचारणें म्हणजे मूर्खपणा होता. आरोग्याच्या बाबतींत त्यांना जरा कसर वाटली होती; पण ' नुकताच आजारांतून उठल्यामुळें जरासा हडकला आहे, खाईल दूधतूप, होईल गुटगुटीत ' या वरपित्याच्या वचनानें त्यांचें समाधान झालें होतें. त्यांना फक्त शंका उरली होती ती एवढीच कीं, असल्या गोऱ्या मुलाला आपली निमगोरी मुलगी करून घेतील कीं नाहीं ? पण वरपित्यानें घरीं येऊन मुलगी पसंत असल्याचा कौल दिला होता.

हें लग्न ठरवण्याच्या कामीं तातोबांनीं बायकोचाहि जिथें सल्ला घेतला नव्हता तिथें प्रभेला कोण विचारणार ? मुलानें मुलीला पाहिलें नव्हतें अन् मुलीला मुलगा दिसला नव्हता. मुलांच्या कल्याणाची स्वयंभू मक्तेदारी असलेल्या दोघांच्या तीर्थरूपांनींच हा व्यवहार ठरवला होता. आणि आतां-पर्यंत सगळें सुरळीत झालें होतें.

जसजशी संध्याकाळ होऊं लागली तसतशी त्या लग्नघरीं नव्या नव्या माणसांची आवक सुरू झाली. बाईच्या कांखेंत गांठोळें अन् पुरुषाच्या खांद्यावर मूल, अशा थाटांत बरीचशी परगांवची नातेवाईक मंडळी येऊन थडकली. कासार आला अन् त्यानें तुळशीवृंदावनाजवळ आपल्या खांद्या-वरच्या कांकणांच्या माळा उतरल्या. वधूला लग्नचुडा भरण्यासाठीं त्याला बोलावणें गेलें होतें. त्यानंतर वाजंत्री आले अन् त्यांच्याबरोबरच भावीणहि आली.

ती आली, गुळपाणी प्याली अन् जातीच्या मिठ्ठास भाषेनें तिनें जमलेल्या बायकांचा परिचय करून घेतला. 'ही काय गे हौंकल?' म्हणून प्रभेकडे बोट दाखवून तिनें तिच्या आईला विचारलें. प्रभेला पायापासून डोक्यापर्यंत एकदां न्याहाळून घेतलें. नागर जीवनाचे संस्कार झालेलें तिचें चालणें, बोलणें, नेसणें, सुरंगीला मोठें आकर्षक वाटलें. प्रभा पिला खूप आवडली.

या लग्नांत सुरंगीकडे मुख्य काम होतें तें मंगळसूत्र गुंफण्याचें. भावीण म्हणजे अक्षय सुवासिनी. तिच्या हातून गुंफलेलें मंगळसूत्र मुलीला अक्षय लाभतें या समजुतीनें तशी चाल पडली होती. प्रभेच्या आईनें तिच्यापुढें वाकाच्या दोऱ्या टाकल्या. एका वाटींत मंगळसूत्र आणि काळी पोतहि आणून दिली.

आपलें मोतिया रंगाचें पातळ आवरून ती एका चटईवर बसली. तिचीं सावळींच पण लांब निमुळतीं बोटें भराभर एकेक मणि ओवूं लागलीं. डोळ्यांचीं कृष्णकमळें मण्याचें 'वेज' अन् दोऱ्याचें टोंक यांची संगति साधूं लागलीं. चोळीची बाही आंखूड असल्यामुळें जवळ जवळ उघडा असलेला तिचा उजवा भुजदंड दोऱ्याबरोबर खालवर होऊं लागला. दहा-बारा मुलें तिच्याभोंवतीं कोंडाळें करून बसलीं. थोड्याच वेळांत तिनें तें काम पुरें केलें.

पण तेवढ्यानें तिचा जीव कुठला स्वस्थ बसायला? मागीलदारचीं अबोलीचीं फुलें अन् पाटाच्या कडेची दरवळती पाच खुडून आणून ती वेणी करायला बसली. ती पुरी झाल्यावर तिनें तिचें मागून पुढून निरीक्षण केलें. जी कुसर तिला त्या वेणींत यायला हवी होती ती आल्याचा हर्ष तिच्या डोळ्यांत चमकला.

" प्रभा बाय ! माच्छी हांगा ये. " पडवीवर कोणाशीं तरी बोलत उभी असलेल्या प्रभेला तिनें नाजूकशी हांक मारली ! प्रभा येऊन सुरंगीच्या पुढ्यांत पाठमोरी बसली. सुरंगीनें तिच्या नितळ केसांतून एक बट अलगद वर उचलून एकहि फूल चुरगळूं न देतां तिच्यांत ती वेणी खोंचली अन् तिच्या मानेवर रुळणाऱ्या अंबाडयाभोंवतीं माळली. किती बेतशीर बसली ती ! तो कुरळ केशसंभार मंडित झाला. सुरंगी एकदां या बाजूला अन् एकदां त्या बाजूला मान वाकडी करून अतृप्त नेत्रांनीं त्याच्याकडे पाहत राहिली. तिची स्वाभाविक प्रेमळ वृत्ति उचंबळली. जांभळ्या खणाची चोळी घातलेल्या प्रभेच्या घाटदार पाठीवरून तिनें आपले दोन्ही हात मायेनें खालीं ओढले अन् म्हटलें, ' जा आतां ! '

पाणंदीच्या पलीकडे असलेल्या बाबूभटजींच्या घरीं वराकडचें वऱ्हाड उतरणार होतें. तातोबांनीं तिथें सगळी तयारी जय्यत ठेवली होती. दिवेलागणीच्या वेळीं गड्यानें येऊन निरोप सांगितला कीं; ' मंडळी आली. ' तातोबा लगेच त्यांचें स्वागत करून अन् त्यांना ' हवें नको ' विचारून आले.

सकाळीं तेलहळदी झाल्या. न्हाऊन तुकतुकीत अंगानें ओल्या केसांची गांठ पाठीवर सैलसर सोडून प्रभा देवदेवकाला बसली. कुवेंडी करतांना तिचें उजळलेलें मुख सुरंगीनें पाहून घेतलें. बायकांनीं रुखवताची ' आईती ' केली. वाजंत्र्यांनीं ताशा कडकडावला. सनईवाल्यानें गोडशी सुरावट फेंकली. शेला पांघरलेल्या प्रभेच्या आईसह सगळ्या सुवासिनी ' रुक्मिणी–सैंवर ' गात रुखवत घालायला गेल्या.

एकटी प्रभा तेवढी गौरीहरापुढें बसली होती. ती दोन्ही हातांची चिमटी करून तांदूळ वहात होती. आपलें नशीब आज ज्याच्या हवालीं केलें जाणार तें माणूस कसें असेल हाच विचार प्रामुख्यानें तिच्या मनांत उठणें साहजिक होतें. हें लग्न तिच्यावर आकस्मिक ओढवलें होतें. तिला अजून पुष्कळ शिकायचें होतें; पण त्याच्यावर आतां पाणी पडलें होतें. शाळेच्या आवारांत अन् मैत्रिणींच्या सहवासांत तिनें हंसून खेळून घालवलेला तो कालखंड आतां स्वप्नवत् झाला होता. ' प्रभेला खूप शिकवूं अन् बी. ए. झालेला, भरपूर पगार मिळवणारा छानदार नवरा मिळवून देऊं ' हे तिच्या चुलत्याचे शब्द आतां निरर्थक ठरले होते. चुलता तिच्या लग्नाला विरुद्ध होता अन् तातोबांनीं

आग्रहाचें निमंत्रण पाठवूनहि आला नव्हता, ही बोचणी तिला दुःख देत होती. ' बापाला जर हेंच करायचें होतें तर त्यानें बेळगांवला आपल्याला ठेवलेंच कशाला ? नवी दिशा दाखवलीच कशाला ? ही तक्रार ती मुखानें उच्चारूं शकत नव्हती; पण ती तिच्या हृदयांत सलत होती.

थोड्या वेळानें दुर्गाच्या पलीकडे ताशा ऐकूं आला. ' आली वाटतं मंडळी ' म्हणून प्रभा भानावर आली. दोन्ही गुडघ्यांच्या आंतून हात घेऊन गौरीहरावर तांदूळ वाहूं लागली. पाटावर मांडलेला गौरीहर तांदुळाच्या राशींत बुडून गेला होता. जवळच रंगीत रोवळीला खण वेष्टून ' शकुन दिवा ' ठेवलेला होता. बाहेर यायला अवसर न मिळाल्यामुळें त्याचा प्रकाश रोवळींतच पुंजाळून राहिला होता. एका बाजूला उत्तराभिमुख समई तेवत होती. प्रभेच्या नमलेल्या मुखावर छाया–प्रकाशांचा खेळ चालला होता. किती मनोहर चित्र होतें तें प्रभेचें ! सुरंगी मधल्या दरवाजांत उभी राहून तें आपल्या डोळ्यांत सांठवून घेत होती.

प्रभेची आई उल्हासाच्या चढत्या वाढत्या कळा घेऊन रुखवत घालायला गेली होती. आज तिला ' सासूबाई ' ही नवी जरतारी ' फीत ' चढणार होती. ती आज ' धू ' देऊन ' पुत ' जोडणार होती. आपला जीवभाव ओवाळून ती त्याचीं कौतुकें पुरवणार होती. पण मुलाला रुखवतासाठीं मुख्य आसनावर आणून बसवतांच तिच्या त्या कळा झडल्या. नवरदेवाला त्याच्या करवल्यांनीं सजवलें होतें खूप. बाशिंगाला अबोलीच्या फुलांचे गोंडे लोंबवले होते ते सुद्धां लहानसहान नव्हते. पण बसलेल्या गालफडांना आणि निस्तेज डोळ्यांना कितीहि शोभवलें तरी विडंबनच तें. आरोग्याची झळक नसलेलें गोरें कातडें डोळ्यांया काय समाधान देणार ?

' हाच का तुझ्या प्रभेच्या नवरा ' म्हणून अंतर्मनानें तिला डिवचलें. त्याचे ते सुकटलेले भेगाळ पाय धुतांना तिच्याहि काळजाला भेगा पडत होत्या. त्या पाय धुवायच्या पाण्यांत तिच्या हृदयांतल्या वात्सल्याची कोमट धार मिसळली नाहीं. ती केव्हांच आटून गेली होती. तातोबांनीं हा मुलगा जर आधीं तिच्या नजरेला घातला असता तर ' हें पाण्याचें पितर प्रभेचा नवरा म्हणून मी आपल्या मांडवांत येऊं देणार नाहीं ' असा खंबीर निश्चय तिनें त्यांना ऐकवला असता. पण आतां सगळ्या गोष्टी हाताबाहेर गेल्या

होत्या. कशीबशी त्याच्या हातावर तुपाची आपोष्णी घालून ती मागें सरली. रुखवत घालून घरीं आल्यावर प्रभेची धाकटी बहीण म्हणाली. ' असलाच का आक्काचा नवरा ? इश्श ऽऽ ! '

कोणी तरी ' शूः ' करून तिला दाबलें. पण ते शब्द गौरीहराच्या नसले तरी त्याच्यापुढें बसलेल्या प्रभेच्या कानीं गेलेच. तिचे हात थबकले. तिनें आपल्या हृदयांत पति म्हणून जें एक सौष्ठवपूर्ण शिल्प कोरलें होतें त्याचा टवका उडाला.

सकाळपासून सुरू झालेल्या समारंभाचें चक्र आतां वेगांत आलें होतें. उपाध्ये बायकांना घाई करीत होते. तातोबांची धांवपळ चालली होती. एका तोंडानें अनेकांना उत्तरें देतांना त्यांचा घसा घोगरा झाला होता. मांडवांत निमंत्रितांची गर्दी उसळली होती.

योग्य वेळीं तिकडच्या जानवश्यांतून वरप्रस्थान निघालें. वाण्याचें एक घोडें सजवून आणलें होतें त्यावर नवरदेवाची स्वारी आरूढ झाली. दुर्गीच्या खिडींतून घोडें पुढें येतांच बायका पिठाचे दिवे घेऊन ओंवाळायला पुढें झाल्या. सगळ्यांपेक्षां सुरंगीला नवरदेव पाहाण्याची विशेष उत्कंठा होती. त्या उत्कंठेत बायकी स्वाभावाचा अंश तर होताच. शिवाय प्रभेविषयींची आपुलकी अधिक होती. पण—

तिची नजर त्याच्यावर पडली मात्र; ती एकदम दोन पावलें मागें सरली. तिचे डोळे विस्फारले ते तसेच राहिले. सगळ्या वृत्ती एकदम गोठल्या. श्वसन स्थगित झालें. या वेळीं तिच्याकडे कोणाचें लक्ष असणें शक्य नव्हतें म्हणून; नाहीं तर ' हिला काय झालें एकाएकीं ? ' म्हणून बभ्रा झाला असता.

थोड्याच क्षणांत ती परत भानावर आली. आपल्याला झाला तो भास तर नाहीं ना म्हणून पुनश्च तिनें निरखून पाहिलें. या वेळीं तातोबा त्याला हातीं धरून मांडवांत आणीत होते. करवतकाठी कोरें धोतर सांवरीत तो त्यांच्या मागून जात होता. सुरंगी मनांत म्हणाली, ' शंका कशाला ? हाच तो ! '

आणि तिला कांहीं महिन्यांपूर्वींचा तो प्रसंग आठवला. एक दिवस चंगीभंगी लोकांचा एक दलाल तिच्याकडे आला होता. तबकांतलें पान तोंडांत

कोंबून तिच्या कानाशीं कुजबुजला होता. 'कुळ चांगलं मातबर आहे; भाळलं तर तुझी पंढरी पिकेल' म्हणून त्यानें तिला आशा लावली होती. आणि तिच्याशीं संकेत ठरवून तो केसांच्या झुलुपांवर आपली केसाळ टोपी तिरकस ठेवून निघून गेला होता.

त्यानंतर दुसऱ्या दिवशीं सूर्यास्ताच्या सुमाराला सुरंगीच्या दाराशीं एक सायकल थांबली होती. एक पाहुणा ओसरीवर येऊन बसला होता. दोनच प्रश्नोत्तरांत सुरंगीला खूण पटली होती. तिचा जातिवंत अभिनय सर्वांगी जागा झाला होता. त्याचा 'परामस' करण्यासाठीं ती स्वतः झटली होती. रात्रभर तिथें मुक्काम करायच्या इराद्यानें तो आला होता. तीहि तें समजली होती. पण त्यानंतर रात्रीं नवाच्या सुमाराला एकदम पारडें फिरलें होतें. त्याच्या मिठींत येऊं पाहणारें सुख विंचू डसल्यासारखें मागें सरलें होतें. मधाचा पेला ओठांपासून हिरावून घेतला गेला होता. त्याला तिथें क्षणभरहि राहणें अशक्य झालें होतें. सुरंगीनें दृष्टि त्याच्याकडे अन् उजव्या हाताची तर्जनी दाराकडे रोखली होती. तोंडांतला विडा चावून लाल करायलासुद्धां तिनें त्याला फुरसत दिली नव्हती. तो उठून उभा राहतांच पलंगावरची चादर डाव्या हाताच्या चिमटींत पकडून तिनें शयनगृहाच्या बाहेर फेकून दिली होती. त्यानें सायकल बाहेर काढली होती. सभोंवतीं पसरलेल्या किर्र, काळ्या रात्रीला तो भीत होता. पण सुरंगीचा धिक्कार त्याहूनहि भयावह होता. तो निघून गेल्यावर धाडकन् दार लावून घेतांना ती आपल्याशींच पुटपुटली होती—

"आपण एक दुर्दशा भोगतोच आहे, अन् माझाहि सत्यानास करायला आला होता. बरी वांचलें मी !"

ज्याचें जन्मांत कधीं ती तोंड पाहाणार नव्हती तो आज तिला परत दिसला होता. आणि तोहि अक्षय सौभाग्य लाभावें म्हणून जिचें मंगळसूत्र तिनें गुंफलें होतें, त्या प्रभेचा नवरा म्हणून. इतक्यांत मधुपर्क सुरू झाला होता. ब्राह्मण मंत्र म्हणत होते त्यांचा अर्थ तिला काय कळणार ! पण ते शब्द तिच्या काळाजावर कुऱ्हाड घालीत होते. ती मनांत म्हणत होती 'आतां काय करावें ! हें लग्न मोडतां येईल का ? प्रभेला ग्रासणारा हा राहू ठोकरून लावतां येईल का ? तिच्या बापाला सांगूं का याचं रहस्य मी ? पण कोण

ऐकणार माझं ? माझी किंमत काय ? मग काय प्रभेचा बळी जात असलेला मुकाट्यानें पाहूं ?—'

अंगणाच्या मेरेजवळच्या एका खांबाला टेकून ती उभी होती. पण पुढें काय करावें हेंच तिला उमगेना. तिनें खांबाला दोन्ही हातांनीं घट्ट धरलें. जणूं त्या माणसाचा गळाच ! लगेच दोन्ही हात झटकून ती किंचित् बाजूला झाली. जणूं त्या खांबाला दुर्धर रोगच जडला आहे. ती वेडीपिशी झाली. तिला एकदां वाटलें कीं याच्या नावानें ' शंखतीर्थ ' घ्यावें अन् गौप्यस्फोट करावा. तिनें ओठ हालवलेसुद्धां. पण शब्दानें दगा दिला. तिला धीर झाला नाहीं.

जसा संताप चढला तसाच झरझर उतरला. अंगांतलें सगळें चैतन्य जणूं त्या केळीच्या गाभ्यासारख्या मांड्यांतून अन् पोटऱ्यांतून खालीं निचरून जमिनींत शिरत आहे असें तिला वाटलें. ती गळाठून गेली. विचारांत निराशा शिरली. ' पोरीचं नशीबच फुटकं असलं तर मी तरी काय करणार ! '

घटका भरली. ब्राह्मणांनीं तांदुळांच्या पुंजीवर वराला उभें केलें अन् समोर अंतरपाट धरला. ' मुलीला आणा ' म्हणून उपाध्यायांनीं आज्ञा सोडली अन् दोंदावरचें घळघळतें नेसण आवरलें. पिंवळी गोल साडी, वर पिंवळेंच वधूवस्त्र पांघरायला, दृष्टि पायांच्या नखांवर, दोन्ही बाजूंना वृद्ध पुरंध्री, पाठीमागून 'करा' 'शकुनदिवा', अशा थाटांत प्रभा पडवीच्या पायऱ्या उतरली. तिला त्या साध्याच पण मंगल वधूवेषांत पाहून प्रेमळांची तहानभूक निवली.

प्रभेला दुसऱ्या तंडुलपुंजावर उभी करून भटजींनीं म्हटलें. ' सुमुहूर्ते ऽ सा ऽ व धा ऽऽ न ! ' आणि मग मंगलाष्टकें सुरू झालीं. ती अंतरापाटाची भिंत एक दोनदां हालली आणि तिच्या पलीकडे अगदीं आपल्या पुढयांत कोणी तरी उभें आहे एवढेंच प्रभेला कळलें. वर मान करून पाहायला तिला लाजेनें बंदी घातली होती. खालची दृष्टि मात्र तिच्या अधिकारांतली होती अन् तिला दिसत होते ते फक्त दोन पाय. हे निरक्त, सुकलेल्या काष्ठासारखे पाय तरुणाचे आहेत का कोण्या पन्नाशीला आलेल्या वृद्धाचे आहेत याचा तिला संभ्रम पडला. या पायांनीं तोलून धरलेलें ' ध्यान ' किती प्रेक्षणीय असेल त्याची तिला कल्पना आली.

आणि एकदम अंतरपाट बाजूला झाला. मान न उचलतांच तिचे डोळे वर गेले. मनांतला विकल्पच सगुण साकार होऊन पुढें दिसला. तिच्या काळाजाचें पाणी झालें. उपाध्यायांनीं तिच्या हातांत बकुळीच्या फुलांची माळ देऊन म्हटलें, ' पुष्पमालां वरकंठे निदध्यात् ! '

प्रभेचे हात हलतात तोंच तिकडून सुरंगी ओरडली.

" प्रभा ! थांब. याला माळ घालूं नको. जन्माचा विचका होईल तुझ्या ! "

त्या भरल्या मांडवाला धरणीकंपाचा धक्का बसला. चहूंकडून शेंकडों डोळ्यांचे भाले सुरंगीवर रोखले गेले. ती घाबरली. हरिणीच्या डोळ्यांनीं सुटकेची वाट शोधूं लागली. शब्द तोंडून गेले होते; पण त्यांचें स्पष्टीकरण करणें अवघड होतें. नवरदेवाची नजर तिच्यावर गेली अन् त्याच्याहि डोळ्यांच्या कवड्या झाल्या. उभा होता तिथेंच तो लटलटूं लागला. त्याच्या पायांखालचे तांदूळ सरकूं लागले.

तातोबा प्रथम हतबुद्ध झाले अन् नंतर भडकले. सुरंगीच्या अंगावर धांवून जातांना ते म्हणत होते,

" शुभ बोल रे नाऱ्या, तर म्हणे मांडवाला लागली आग " हडळ कुठली ! असलं अवलक्षण बोलायचं होतं तर आलीस कशाला या मांडवांत ? जा, तोंड काळं कर इथून. जा म्हणतोंना ? "

तातोबा धुसमुसत पुढें येऊं लागले तसतशी सुरंगी खांबाचा आधार सोडून मागें हटूं लागली. त्या वेळचें तिचें चित्र करुणाजनक होतें. डोळ्यांत आर्तता दाटली होती. तोंड रडवेलें झालें होतें. नागाच्या लवलवत्या फणी-सारखे तिचे दोन्ही हात ' मी जातें, मला मारूं नका ' असा भाव सुचवीत होते. ती बरें करायला, बुडत्याला वांचवायला गेली होती, पण स्वतःच भोंवऱ्यांत सांपडली होती.

कृतांताचें रूप घेऊन मागें लागलेल्या तातोबांकडे पुनःपुन्हा वळून पाहात ती दुर्गीच्या पलीकडे गेली. तिला त्या लग्नघरांतून खण—नारळ मिळायचा होता. तिची संभावना व्हायची होती. पण तातोबांच्या एका शब्दांतच तिचे सगळे सोपस्कार झाले.

" पापाची अवलाद ! "

सुरंगीला आतां बारा वाटा मोकळ्या झाल्या होत्या. दुर्गाच्या दोन्ही डगरींवर हात ठेवून उभ्या असलेल्या तातोबांना ती धीर करून म्हणाली,

" जातीचे ' भट ' आहांत तुम्हीं ! असल्या शिव्या शोभत नाहींत तुमच्या तोंडांत. मी काय सांगतें हें आतां तरी ऐकून घ्या. त्या पोरीचे ' दायजी दुस्मान ' होऊं नका. "

एक तिरस्काराचा कटाक्ष तिच्यावर टाकून तातोबा माघारीं वळले. घाईघाईनें मांडवांत आले. प्रभा नवरदेवासमोर उभी होती. जणूं मांडवाच्या पुरलेल्या मेढींपैकींच एक ! ती बकुळीची माळ तिच्या पायाशीं गळून पडली होती. तातोबांनीं तो उचलून तिच्या हातीं देत म्हटलें, " हं घाल... ! " प्रभेचे हात उचलेनात तेव्हां त्यांनी दांतओठ खाल्ले.

" कार्टे , बघत काय राहिलीस ! माळ घाल कीं. "

त्यासरशी माळ थोडीशी वर गेली अन् लगेच तिच्या डहाळ्या पडल्या. ' जीव नाहीं का तुझ्या हातांत ? ' म्हणून तातोबांनीं तिचे हळदीनें पिंवळे झालेले निष्पाप, निर्मळ हात स्वतः पकडले आणि ते उंचावून ती वरमाळ समोरच्या आकृतीच्या गळ्यांत घातली. त्या आकृतीनेंहि तिचा गळा गोवला. उपाध्ये गरजले. ' वाजवा रे वाजवा ! ' त्या एकदम उठलेल्या वाद्यध्वनींत प्रभेच्या हृदयाचें आक्रंदन कोणालाच ऐकूं गेलें नाहीं ! !

व्याह्यांना सून मिळाली. नवरदेवांना गृहलक्ष्मी लाभली. विहिणींना मानपान मिळाले. उपध्यांची कडोसरी घट्ट झाली. तातोबांची अब्रू बचावली. सगळ्यांचे सगळे मनोरथ पुरले. गचांडी मिळाली ती सत्याला. तें आतां एकट्या प्रभेच्यापुढें उभें राहाणार होतें. आपला प्रखर प्रकाश पाडून तें प्रभेला दाखवणार होतें. " बघ प्रभे ! हें तुझ्या बापानं तुला बहाल केलेलं सौभाग्य ! हें शापदग्ध जीवन ! ! "

• • •

# वेडा

## १०

लग्नमंडप चिकार भरला होता. पंचक्रोशींतलीं माणसें जमलीं होतीं. सकाळचे दहा वाजण्याची वेळ होती. मुहूर्ताला अजून दोन घटका अवकाश होता. बकुळीच्या फुलांची माळ बांधलेल्या पातेल्यांतले घटिकापात्र बुडालें कीं उपाध्येबुवा तुळशीवृंदावनाला टेकून ठेवलेल्या आडव्या पाटावर सावकाशपणें ओल्या पिंजरीचें एकेक बोट ओढीत होते. दहापांच मंडळींच्या कोंडाळ्यांत एकेक चंची सुटली होती. माजघरांत ताकांतले पोहे अन् मुगांचें कढण यांचा समाचार घेऊन बाहेर येणारे नवे पाहुणेहि 'बार' भरण्यासाठीं त्याच कोंडाळ्यांत घुसत होते. अशा प्रकारें सगळ्याच वर्तुळाचा परिघ हळूहळू वाढत होता. गप्पा आणि विनोदी वाक्यें यांची रंगत उडाली होती आणि नवरदेव मंडपांत येईपर्यंत हें असेंच चालणार होतें.

पण एवढ्यांत एक नवा अंतराय उपस्थित झाला. कोणी तरी मंडपद्वाराकडे बोट दाखवून ओरडलें. "अरे, तो बघ वेडा भालू!"

एक तरुण पण कृश मूर्ति मांडवाबाहेर उभी राहिली होती. एका घळघळीत लंगोटीनें त्याची लाज सावरली होती. गोणपाटाचा एक तुकडा सगळ्या वस्त्रप्रावरणांचा प्रतिनिधि म्हणून त्याच्या डाव्या खांद्यावर लोंबकळत होता. अंगावर मळाचें एक पुट चढलें होतें तें त्याच्या 'जडभरती' वृत्तीला साजेसेंच होतें. पण तरीहि त्याचा गोरा रंग लपला नव्हता. धूलिधूसर दाढीमिशांच्या जंगलांत सांपडूनहि त्याच्या नाकाची कळी उठावदार दिसत होती. निष्कलंक चंद्रखंडासारखी कपाळपट्टी, रेखीव पातळ जिवणी अन् सुबक हनुवटी हे पुरुषसौंदर्याचे गुणविशेष त्याच्या देहाकारावर प्रगट होऊन आजमितीस तरी असफल झाले होते. अभ्यंग स्नान घालून, केंस विंचरून अन् लिंबोणी रंगाची पायघोळ रेशमी कफनी पेहेरवून त्याला जर एखाद्या सभेंत बसवलें असतें, तर रवींद्रबाबूंच्या शांतिनिकेतनांतून एक नवा

चिंतनशील तत्त्वज्ञ कवि नुकताच बाहेर पडला आहे असेंच एखाद्यानें त्याच्याबद्दल म्हटलें असतें. तिथें आल्यावर आपले खोल डोळे त्यानें मांडवांतल्या जनसंमर्दावर रोखले होते; पण त्यांपैकीं कोणीहि त्याचें लक्ष्य नव्हतें.

" याला कोणीं बुवा अक्षत दिली होती ? " एकानें कोणीं तरी उपहासगर्भ पृच्छा केली. आणि मग सगळयांच्या नजरा त्याच्याकडे वळल्या. अधिक उत्साही होते ते त्याला सामोरे गेले. एका वेडयाला दहावीस शहाण्यांची प्रभावळ शोभली.

आणि मग शहाण्यांच्या लीला सुरू झाल्या. कोणी आपल्या हातांतल्या काठीनें त्याच्या खांद्यावरच्या गोणपाटाला जमीन दाखविली. कोणी त्याच्या तोंडावरून हाताच्या आरत्या ओवाळल्या. कोणी त्याला त्याच्या ' ठिकाणा 'ची हकीकत विचारली. कोणी त्याला डिचोलीच्या एका नव्या वकिलाचें नांव सांगून त्याला भेटण्याचा सल्ला दिला. कोणी हंसले, कोणी कटकटले, कोणी फडाडले. त्याला बोलता करून हास्यरस पिकवावा अशीच त्या सर्वांची अपेक्षा होती.

पण त्यांपैकीं एकहि मात्रा त्याला लागू पडली नाहीं. तो पुरलेल्या खांबासारखा निश्चल होता. त्याची अधोदृष्टि क्षणभरहि वर झाली नाहीं. लोकांनीं घेरल्यामुळें संकोचाचें जें एक सूक्ष्म स्मित त्याच्या जिवणीवर उमटलें तेंहि तसेंच कायम राहिलें होतें. वाचा विटाळण्याचा त्याचा विचार मुळींच दिसत नव्हता. तो लोकांचे उपहास—कटाक्ष झेलीत होता. पण त्यांपैकीं कांहींच परत करीत नव्हता. त्यामुळें करमणुकीसाठीं हपापलेलें त्याच्या भोंवतालचें जग आतां निराश होऊं लागलें होतें. ' मरूं दे ! कशाला त्याच्या नादीं लागतां ? ' असे अभिशाप उच्चारीत कांहीं शिष्ट मांडवांतलें आपलें आसन अन् बासन संभाळूं लागले होते.

एवढयांत आणखी एक शहाणा स्वैंपाकाच्या मांडवांतून तिथें उगवला. पिचकारी टाकून खांद्यावरचा ओला पंचा उडवीत त्यानें त्या वेड्याला हटकलें, " काय रे भाल्या ! कशाला आलास इकडे ? आतां वारणा गेली तुझ्या हातची. आत्तां वाजतगाजत, बाशिंगाचे गोंडे हालवीत तिचा नवरा येईल अन् तिचा हात धरून निघून जाईल. तुझ्या हातांत धुपाटणंच आतां ! ठिकाणहि नाहीं अन मलगीहि नाहीं. "

या डागणीचा मात्र त्याला चरका बसला. त्याची भूमिदृष्टि वर उचलली. डोळ्यांतल्या बाहुल्या जळजळून उठल्या. कसला तरी असह्य आघात व्हावा तसा तो उभाच्या उभा थरारला. त्या पंचेवाल्याच्या रोखानें त्याचीं दोन पावलें पुढें पडलीं आणि तो ' टाइम बॉंब ' फुटला !

" कोण रे तूं ! माझ्या हातांत धुपाटणं देतोस काय ? वारणेचा नवरा व्हायला कोण मायेचा पूत आला आहे तो दाखव मला ! मी नारसिंह अवतार आहें. हिरण्यकशिपूसारखीं त्याचीं आतडींच काढतों बाहेर. मी परशुराम आहे, ठाऊक नाहीं वाटतं ? निःक्षत्री पृथ्वी करून टाकीन—काय समजलांत तुम्ही ! वारणा माझी आहे. मी तिला अश्शी...अश्शी कवटाळून धरीन..."

भालूनें एकाएकीं जो राक्षसपार्ट उभा केला त्यानें सगळें लग्नघर दणाणलें. माणसें जिथल्या तिथें स्तंभित झालीं. आचाऱ्याच्या हातून चिंचेचा सगळाच गोळा आमटीच्या पातेल्यांत एकदम सुटला. मुगाचें कढण पिणाऱ्यांचे भरलेले कढत द्रोण अंगावर सांडले. तंबाखूची फक्की तोंडांत टाकणाऱ्यांचा हात तोंडावरच राहिला. खुर्चानें भरलेली कडोसरी आवळणाऱ्या उपाध्यांच्या हाताच्या चिमट्या तटस्थ झाल्या. शेजारच्या घरीं जानोसा केलेल्या नवरदेवाला रुखवत घालून परतलेल्या पुरंध्रींचें ' रुक्मिणीसैंवर ' गळ्यांतल्या गळ्यांत थिजलें !

वारणा या बाहेरच्या जनसमूहांत नव्हती. तिला गौरीहरापुढें बसवून तिची आई रुखवताला गेली होती. त्यामुळें बाहेर काय चाललें आहे तिकडे तिचे डोळे पोंचत नव्हते. पण भालूचा तो आक्रंद, भिंतींच्या अन् छपराच्या रंध्रारंध्रांतून आंत घुसला अन् तिच्या कानांवर आदळला. वारणेला त्या शब्दांची ओळख तात्काळ पटली. गौरीहराच्या मस्तकावर वाहिली जाणारी तिची तांदुळांची ओंजळ भलतीकडेच रिती झाली. पिवळ्या अष्टपुत्रींत वेढलेल्या तिच्या नाजूक श्यामतनूवर शहारून ' कांटाळा ' आला. आवळ चोळींतलें तिचें काळीज कलकलूं लागलें. या अरिष्टाची तिनें अटकळ केली नव्हती. तिनें आपलीं नेत्रदळें क्षणभर मिटून घेतलीं आणि पुन्हां उघडलीं. तांदुळांच्या राशींत दडलेल्या गौरीहराकडे पाहणारी तिची आतांची दृष्टि अगदींच वेगळी होती. ' आपलें सौभाग्य शतायुषी होऊं दे ' हेंच

अशा वेळीं कोणतीहि नववधू गौरीहराकडे मागत असते; पण वारणेचें मागणें अगदींच वेगळें होतें– बाहेर आलेल्या त्या प्राण्याचा आक्रोश थांबूं दे. तो आला तसा निघून जाऊं दे !

पण तिच्या या प्रार्थनेला गोरीहरानें मान दिल्याचें दिसत नव्हतें. त्याचें तणतणणें अजूनहि थांबलें नव्हतें.

'......त्या पांड्या हरामखोरानं माझं 'ठिकाण' खाल्लं अन् या वारणेच्या बापानं दिलेला शब्द खाल्ला. माझी आई हाय खाऊन मेली अन् हे दोघे कंस चाणूर तिचं आयुष्य खाऊन माजाला आले आहेत. थांबा तुम्ही. दोघांच्याहि उरावर थयथय नाचणार आहें मी !"

आणि खरोखरीच त्यानें नाचून दाखवलें. लोकांनीं मनमुराद हंसून घेतलें. भोंवतालच्या मंडळींत कांहीं लोक त्याच्या या अकस्ताळीपणामागचे धागेदोरे जाणणारे होते; पण ज्यांना कांहीं ठाऊक नव्हतें त्यांची जिज्ञासा आतां उतू गेली. ते हातांची प्रश्नमुद्रा नाचवून जवळच्यांना विचारूं लागले, "हें काय गौडबंगाल ? हा पांड्या कोण ?"

भालूचा एक 'शिमशेजारी' त्यांत होता. त्यानें तो पूर्वेतिहास सांगण्याची जबाबदारी उचलली. तो म्हणाला—

हा पांड्या म्हणजे पांडोबा परांजपे. आमच्या गांवचा बडा ठिकाणदार. गांवांतल्या कित्येक लोकांच्या टाळूवर हात फिरवून गबर झालेला. वाल्या कोळ्यानं खड्यांनीं रांजण भरले तसे त्यानं रुपयांनीं भरले आहेत. तो या भालूचा—या वेड्याचा—सख्खा चुलता. भावानं वांटणी घेऊन वेगळी चूल मांडली त्या दिवशीं त्याला अन्नपाणी विषासमान लागलं. भावाचं प्रेम तुटलं म्हणून नव्हे; तर उत्पन्नांतला अर्धा भाग हाताबाहेर गेला म्हणून ! तुटलेलं प्रेम नव्हे; पण उत्पन्न पुनश्च आपल्या घराला कसं सांधलं जाईल हा एकच निदिध्यास त्या दिवसापासून त्यानं घेतला होता. भाऊ हयात होता तोंवर त्याचं कांहीं चालण्यासारखं नव्हतं.

कित्येक वेळां सज्जनांच्या सत्य संकल्पांपेक्षां दुर्जनांचे घातकी मनोरथच फलद्रूप झालेले पाहायला मिळतात. थोड्याच वर्षांत भालूचा बाप निवर्तला. त्यामुळं पांडोबा शंकरावर लघुरुद्र-महारुद्र करीत होता तो भावाचं आयुष्य संपुष्टांत आणण्यासाठींच असं आतां वाटतं.

भालू त्या वेळीं अवघा सतराअठरा वर्षांचा होता. पोरवय, संसाराला अनभिज्ञ. स्वभाव सुतासारखा सरळ. कुणाच्या पोटांतले पाय ओळखण्याइतकी अजून त्याची बुद्धि परिपक्क झाली नव्हती. खरं म्हणजे तो भांबावला होता. नेमकं याच वेळीं चुलत्यानं त्याच्यावर मोहजाल पसरलं. कणिकनीतींत मुरलेल्या त्या खलपुरुषानं त्याच्याविषयीं अत्रचित प्रेमपान्हा फोडला. ' आपले दोन मुलगे तसा तूं तिसरा ' हें ध्रुवपद तो त्याच्या कानीं वारंवार आळवूं लागला. सांखळीच्या बाजाराला गेल्यावर तांदुळांचा आख्खा गोण भालूच्या नांवें उधार खरेदी करायचा अन् त्यांतले पायली दोन पायली तांदूळ त्याच्या घरीं आणून टाकायचें असलीं कारस्थानं सुरू झालीं.

" बैल नाहींत म्हणून शेत खंडानं देणं हें काय शहाणपण झालं ? माझ्या घरीं बैलांची जोडी आहे; तिची काय पूजा का करायची आहे ? उद्यांपासून जोत बांध शेतांत. " पांडोबानं एक दिवस भालूला सांगितलं. भालूनं नांगर धरला; त्याच रात्रीं पांडोबानं आपली लेखणी धरली. समईच्या प्रकाशांत पांडोबांच्या कीर्दीवर शिन्याच्या शाईचीं काळीं अक्षरं उमटलीं—

" भालचंद्र नारायण परांजपे यांस बैलांचें जोत विकत दिलें, त्याचें येणें रुपये दोनशें. "

दुसऱ्या वर्षींहि आणखी एक तशीच नोंद झाली— " गेल्या वर्षीचें जोत वाघानें खाल्यामुळें भालचंद्र यास नवें जोत घेऊन दिलें त्याचें येणें रुपये २१०. "

वस्तुतः बैल वाघानं खाल्ले नव्हते आणि जे होते तेहि पांडोबांच्या गोठ्यातच होते. पण अशीं एक-दोनच नव्हे तर अनेक कलमं भालूच्या नांवावर चढत होतीं. भालूला मात्र त्याचा तिळायेवढासुद्धां सुगावा लागला नव्हता. तो काकांच्या पारलौकिक प्रेमांत मस्त होता. शेजारी त्याला जागा करण्याचा प्रयत्न करीत; पण तो त्यांच्याशींच हमरीतुमरी करी. अशा वेळीं ते त्याला म्हणत, " आता गोंजारतो आहे, त्याचं सुख वाटतं तुला; पण ज्या दिवशीं काळजांत नखं रोवील त्या दिवशीं तुला गोबरांत बसावं लागेल हें लक्षांत ठेव ! "

आणि खरोखरच तसा प्रसंग भालूवर लवकरच गुदरला. सुपारीचं पीक काढण्याच्या ऐन मोक्याच्या वेळीं एक दिवस पांडोबानं भालूच्या कुळागरावर

जप्ती आणली. पोफळींवरचीं भरदार शिपटीं तोडून ती रास जेव्हां तो आपल्या घरीं नेऊं लागला. तेव्हां भालूला त्या प्रकाराचा कांहींच उमज पडेना. त्यानं विचारलं, " काका, माझं ठिकाण तुम्ही पाडतां याचा अर्थ काय ? "

त्यावर पांडोबानं त्याला खडसून सांगितलं, " हें ठिकाण आतां तुझं राहिलं नाहीं. बाराशें रुपये मुद्दल अन् तीनशें रुपये व्याज असं पंधराशें रुपये तूं मला देणं लागतोस. तें फेडशील तेव्हांच तुला ह्या ठिकाणांत पाय ठेवायला मिळेल ! "

भालूला आपण जागे आहोंत का स्वप्नांत आहोंत तेंच कळेना. ' मी अन् काकाचं देणं ? अन् तेंहि पंधराशें रुपये ? कुठल्या जन्मांतलं हें ? ' तो क्षणभर जडमूढ झाला. पण ती सर्व नागवण त्याला उघड्या डोळ्यांनीं पाहवेना. तो आषाढांतल्या मेघासारखा गरजला, " काका, हें खोटं आहे. मूर्तिमंत असत्य आहे. मी तुमचं एक पैहि देणं लागत नाहीं. तुम्ही माझ्या ठिकाणांतून चालते व्हा नाहीं तर जीव घेईन मी तुमचा ! "

पण त्याचे ते शब्द फुसके ठरले अन् हवेंत विरले. एका वेळेंत सगळ्या पोफळी रिकाम्या झाल्या. उभ्या वर्षाचं पोट गेलं ! त्या वर्षीं पीक चांगलं आलं होतं अन् त्यानं निराळाच मनोरथ केला होता. सुपारीचे दाम हातीं येतांच माघ महिन्यांत तो चतुर्भुज होणार होता. वधू निश्चित होऊन दोन वर्षं झालीं होतीं. आजची नवरी मुलगी वारणाच त्याला द्यायची ठरली होती. पण लग्न या ना त्या कारणानं लांबणीवर पडलं होतं. यंदां मात्र मुलीचा बाप थांबायला तयार नव्हता. चांगली मुलगी लवकर आपल्या घराला यावी अशी भालूलाहि उत्कंठा लागली होती. पण ऐन वेळीं पांडोबा असा आडवा पडला !

लग्नाची तयारी बाजूलाच उरली अन् कोर्टांतले खेटे सुरू झाले. पण भालूची दावा लढण्याची आर्थिक ताकद थोड्याच दिवसांत खलास झाली. पैसे उभे करण्यासाठीं तो वणवण हिंडला; पण कुणी त्याला दारावर उभं करीना. चंदी बंद पडल्यामुळें त्याचा वकील त्याच्यावरच फिरला ! त्याला

एकहि साक्षीदार मिळेना. याच्या उलट, पांडोबानं आपल्या बाजूला साक्षीदारांची फरड लावली. देणं शाबीत होण्याच्या मार्गाला लागलं. भालूनं आणाशपथा घेऊन कर्जाचा इन्कार केला; पण कोर्टाला ते पटेना.

अशा अवस्थेंत ती तारीख संपली अन् भालू जळत तापत घरीं आला. त्याची आशा मावळली होती आणि भयाण भविष्य आ वासून पुढं उभं राहिलं होतं. आधींच डोकं चक्करलेलं, तशांत त्याच्या आईनं आणखी एक जिवाला लागणारी गोष्ट त्याच्या कानांवर घातली. वारणेच्या बापानं कळवलं होतं, कीं ' मुलीच्या लग्नाबाबत आपली ठरलेली बोलणीं रद्द समजावीं ! '

आधींचं दुःख अन् त्यावर ही डाणगी. भालूच्या सहनशक्तीचे तणावे तुटले. तो एकदम आईवरच उसळला. वारणेच्या बापाच्या जागीं तिलाच कल्पून अभद्र शिव्यांचा भडिमार करूं लागला. शेजारी जमा होतांच त्यानं त्यांच्यावरच आपला मोर्चा वळवला. त्याच्या उक्तींतला अन् कृतींतला ताळतंत्र सुटला आणि माणसांतल्या भालूचा अवतार त्याच वेळीं समाप्त झाला. त्याचं डोकं बिथरलं तें कायमचंच !

त्या गृहस्थानें भालूचा हा पूर्वेतिहास सांगून संपवला; पण तेवढ्या वेळांत भालूचा थयथयाट कांहीं संपला नाहीं. एवढ्यांत वारणेचा बाप त्रासिक मुद्रेनें आपलें काम टाकून बाहेर आला. त्याला पाहतांच भालूचा पारा एकदम उतरला. शरमल्यासारखा भाव मुद्रेवर दाखवून त्यानें हात जोडले, "नमस्कार मामाजी ! "

" काय झालं आरडाओरडा करायला ? " वारणेच्या बापानें दरडावलें.

भालूनें मान खालीं घातली. त्याच्या दाढीचे केंस छातीवर हुळहुळूं लागले. नजर पावलांवर स्थिर झाली. वाणीनें मौन स्वीकारलें. लोकांना हें अजब झालें. त्यांना वाटलें, कीं नागाला गारुडी भेटला. वारणेच्या बापानें आपली विजयी दृष्टि लोकांवर फिरवली. ' जें तुम्हां शंभर लोकांना जमलं नाहीं, तें मी फक्त एका वाक्यांत घडवून आणलं. आहे कीं नाहीं माझी शहामत ? ' असें जणूं ती दृष्टि जनसमूहाला बजावीत होती.

" कुणीं बोलावलं होतं तुला इथं ? " पुन्हा त्यानें भालूला छेडलें.

" बोलवायला कशाला हवं, मामाजी ! वारणेच्या लग्नाला मी न येऊन कसं चालेल ? नवऱ्या मुलाशिवाय लग्न कसं लागायचं ? "

" पुरे कर तुझी बडबड ! मघापासून ऐकतों आहें. यापुढं वारणेचं नांव उच्चारलंस तर इकडचं थोबाड तिकडे करीन. समजलं ? झाकल्या पाटीनं चालता हो इथून. तुझं काम नाहीं इथं. चलो, चलो. "

वारणेच्या बापानं पुढं होऊन वाटेकडे अंगुलिनिर्देश केला. तसें करीत असतांना त्यानें आपली मुद्रा शक्य तेवढी भीमरूपी केली होती. पण भालूवर तिचा परिणाम झाला तो माल उलट !

" हुं ! चलो चलो करायला मी कांहीं भिकारी म्हणून आलों नाहीं तुझ्या दारांत. म्हणे तुझं काम नाहीं इथं ! मग कुणाचं आहे—तुझं ? वारणेचा नवरा कोण तूं होणार आहेस ? बाप आहेस का भंगड ? गळ्यांत माळ पडली कीं चाललों वरात घेऊन. दाराशीं येऊन नाक घासलंस तरी तुझी पायरी चढायचा नाहीं. अन् वारणेला सुद्धां विसर मग...बोल, कुठं आहे वारणा ? आण तिला बाहेर ! "

तो त्या गर्दीतून मुसंडी मारून मांडवांत घुसला. त्याच क्षणीं बायका भिंतीला चिकटल्या. पोरांनीं पळ काढला. उपाध्येबुवांच्या डोळ्यांच्या कवड्या झाल्या. " हें गो काय, अये अरिष्ट ऽऽ ! " बाळ्या-बुगड्यावाल्या वृद्धा नारी उद्गारल्या. वारणेचा बाप त्याच्या मागोमाग आंत आला. केळीच्या सोपाचा मधला दांडारा जवळच्या भेरेवर पडला होता तो उचलून त्यानें भालूच्या पाठीवर सपकदिशी आवाज काढला. आंगठ्याच्या जाडीचा एक लांबलचक तांबडा वळ भालूच्या आडव्या पाठीवर उसळला !

आंत बसलेल्या वारणेला तो प्रहार आपल्याच पाठीवर कडाडल्यासारखें वाटलें. तिनें मान कलती अन् हातांचा संपुट करून मनाशीं म्हटलें, ' देवा गौरीहरा ! काय घडतंय् हें ! नाना कां मारतात त्याला ? तो इथून गेला पाहिजे हें कबूल. नानांना, तसाच मलाहि तो दृष्टीपुढं नको आहे. त्याचे असले जीवघेणे शब्द माझ्या नवऱ्याच्या कानांवर जायला नको आहेत. तो एक माणसांतून उठला आहे. पण मला माणसांत वागायचं आहे. अन्नूनं दिवस काढायचे आहेत. तो आणखी कांहीं वेडंविद्रं बोलूं लागला तर लोक

नाना कुतर्क काढतील त्याच्यांतून अन् सगळीकडे आग लावीत सुटतील. माथेफिरू वेड्यापेक्षां हे शहाणे वेडेच फार भयंकर असतात. नानांनासुद्धां हीच भीति वाटत असली पाहिजे...

' पण म्हणून काय त्यांनीं त्याला मारावं ? इजा केल्याशिवाय त्याला नाहीं का बाहेर घालवतां येणार ? मी बाहेर गेलें तर चुटकीसरशीं हें काम करीन. माझं नक्की ऐकेल तो. मागं नाहीं का ऐकलं ? कोर्टांत दावा चालू असतांना असाच तो एकदां आमच्याकडे आला होता. त्याला धीराचा शब्द हवा होता. मार्गदर्शन हवं होतं. पण नाना त्याला भेटले नाहींत अन् भेटले असते तरी त्याचा हेतु सफल झाला नसता. कारण, नानांची सहानुभूति त्याचं ठिकाण गेल्याच्या दिवसापासूनच आटली होती. तो निराश होऊन परत निघाला होता. आमच्या कुळागराच्या मुळसांत मी त्याला भेटलें होतें. तो थबकला होता. मला सगळी आपदा सांगून तो अखेर म्हणाला होता, " वारणा ! माझी बाजू सत्याची आहे. न्यायहि माझ्याच बाजूचा व्हायला हवा. पण मी निष्कांचन अन् माझा प्रतिस्पर्धी धनंतर; त्यामुळं तो त्याच्याकडे वळण्याचा संभव आहे. तसं झालं तर माझं संपलं सगळं ! पण मीं निर्धार केला आहे, वारणा. माझा वैरी जर विजयी झाला तर असत्याचा तो विजय भोगायला त्याला जगांत ठेवायचा नाहीं; एक सडकं पाप जगांतून धुऊन काढायचं. एर्वीतेर्वीं मी जगांतून उठणारच. तसा नाहींसा व्हायचा तो असा जाईन काळ्या पाण्यावर. "

त्यावर दाटलेल्या गळ्यानं मीं म्हटलं होतं, " असलं कांहीं अघोरी करूं नका. तुमच्या आईला जन्माची खाईत लोटाल अशानं. "

" होय, पण तुझा मार्ग तरी मोकळा होईल ना ? "

" किती कठोर बोलतां तुम्ही–" अन् असं म्हणतां म्हणतां माझे डोळे पाझरूं लागले होते. तोहि गहिंवरला होता.

" वारणा, तूं रडतेस ? माझ्यासाठीं रडतेस ? खरंच, किती बरं वाटलं ! किती धीर आला ! आजवर सगळेच हंसणारे भेटले मला. रडलीस ती फक्त तूं एकटी. हे तुझे अश्रू गंगाजलासारखे काळजाच्या कुपींत संभाळून ठेवीन मी. या अश्रूंचा मान राखण्यासाठीं तरी मी अविचार करणार नाहीं. जग

अफाट आहे. त्यांत आपल्या दोघांचा कुठेंहि समावेश होईल." कसेबसे हे शब्द उच्चारून त्यानं माझा निरोप घेतला होता. त्या दिवशीं त्यानं माझं ऐकलं. आजहि तो तसंच ऐकेल असा मला विश्वास आहे. त्या वेळची तीच प्रेमज्योत आजहि त्याच्या हृदयांत तेवते हें मला दिसतं आहे. मी बाहेर जाऊन त्याला "तुझ्यासारखीच आणखी एक वेडी जगभर भटकत राहावी असं तुला वाटत नसेल तर तूं यापुढं कधींहि माझ्या जीवनांत डोकावतां कामा नये," असं जर म्हटलं, तर तो क्षणभरहि इथं थांबणार नाहीं. पण मला बाहेर जाऊं देणार कोण ?'

आंत वारणेचे हे विचार चालले होते, तर बाहेर भालूचें तांडव प्रकर्षाला आलें होतें. तो 'वारणा' 'वारणा' करीत मांडवांत धुमाळी घालीत होता. मंडपद्वाराचें आंब्याच्या पानांचें तोरण तोडून त्यानें आपल्या डोक्याला बाशिंग बांधलें होतें आणि आतां तर बोहोल्यावर चढून तो स्वतःच मंगलाष्टकेंहि म्हणूं लागला होता—

'लक्ष्मीऽऽः कौऽस्तुभ पारिजाऽऽतक—'

वारणेच्या बापाचा विवेक आतां पार कोलमडला. त्यानें त्याच्या मागोमाग जाऊन त्याची पाठ, मांड्या अन् पोटऱ्या काळ्या निळ्या करून टाकल्या. हातांतल्या दांडाऱ्याच्या पिंजून चिरफाळ्या होतांच त्यानें हस्तप्रयोग सुरू केला. भालू पळून जाण्याऐवजीं जमिनीवर पालथा पडला.

"मार, मार, आणखी मार. जीव घे माझा. वारणेला रंडकी करून कोपऱ्यांत बसव !"

प्रसंगानें गंभीर स्वरूप धारण केलें. दोघां स्नेह्यांनीं वारणेच्या बापाला आवरलें. आणखी दोघांचौघांनीं भालूला तिथून उचललें. ते त्याला घेऊन वाट चालूं लागले. वहाळापलीकडच्या कुळवाड्यांच्या वाडयावर त्याचें मोटळें सोडून ते परत येतात तों तोडलेलें तोरण परत जोडलें गेलें होतें. त्याच्या खालून नवरदेव येऊन बोहोल्यावर चढला होता. अंतरपाटाच्या दुसऱ्या बाजूला वारणा उभी होती. लग्नघटका बुडाली होती आणि भटजी लांब लांब हेल काढीत मंगलाष्टकें म्हणत होते !

'लक्ष्मीऽऽः कौऽस्तुभ पारिजाऽऽतक सुरा...'

त्या लग्नघराचें घटकेपूर्वीं कुरुक्षेत्र बनलें होतें हें आतां त्या गोंगाटांत 'इतरेजन' विसरून गेले होते. पण वारणा ? 'कुर्यात् सदा मंगलम्' हें पालुपद कमींत कमी आठ वेळां तिनें ऐकलें. पण त्यांतलें मंगलच तिला प्रतीत होईना ! ती अजून वर्तमानाशीं संलग्न झाली नव्हती. अंतरपाट बाजूला होऊन अक्षतांचा शेवटचा हप्ता चहूबाजूंनीं मस्तकावर पडल्यानंतर तिनें मान हळूच वर केली. तिच्या जीवनाधाराची मूर्ति सुवेष, सालंकृत होऊन उभी होती. तो अर्धनग्न, जटिल, धूसर वेडा आतां इथें नाहीं हें तिला ठाऊक होतें; पण तरीहि तिची नजर आसमंत धुंडाळून आली. कां तें कोण सांगणार ! मनाचे सगळेच धागे कुठे उकलतां येतात ?

कन्यादानाच्या वेळीं ब्राह्मणमंडळी सुरांत सूर मिसळून मंत्र म्हणत होती. " कन्या तारयतु, पुण्यं वर्धताम्, शांतिरस्तु, पुष्टिरस्तु– " किती करुणोदात्त प्रसंग तो ! आपल्या पोटच्या गोळ्याबद्दल 'दत्तम्' म्हणून दुसऱ्याच्या हातावर उदक सोडायचें. कोणताहि सहृदय बाप अशा वेळीं हळदीनें पिंवळी केलेल्या आपल्या 'सोन्यासारख्या' मुलीकडे कूर्मदृष्टीनें पाहूं लागतो. त्याच्या अंतरांत श्रीहरीची करुणा ओसंडते. वात्सल्याच्या रसधारा 'नको' म्हटलें तरी वाहूं लागतात. बाप त्या वेळीं क्षणभर 'आई' होतो.

पण वारणेचा बाप त्या मंगलविधानाशीं तसा समरस झाला नव्हता. त्याचे डोळे लाल झाले होते; पण ते अश्रू गाळून नव्हे, तर भालूच्या क्रोधानें ! त्याची करडी मुद्रा अजून शान्त स्निग्ध झाली नव्हती. भालूनें आपल्या समारंभाचा ऐन वेळीं विचका केला हें शल्य अजून त्याच्या काळजांत खुपत होतें.

कन्यादान देणाराची ही तऱ्हा; पण तें घेणारा नरवदेव तरी कुठें सुप्रसन्न होता ? लग्नापूर्वीं त्या मांडवांत घडलेला प्रकार त्याच्याहि कानांवर गेला होता अन् त्यामुळें तोहि जरा बिचकल्यासारखा झाला होता. तो हिरमुसला आहे हें कळून वारणा आणखी अस्वस्थ झाली होती. राहूचें ग्रहण चंद्राला अन् चंद्राचा अंधार पृथ्वीला–असा कांहींसा तो प्रकार झाला होता.

पण हीं जळमटें कोणाच्याच मनांत फार वेळ टिकलीं नाहींत. सनईतून फेकले जाणारे मधुर आलाप, रमणींचा मनोज्ञ संभ्रम अन् मित्रमैत्रिणींच्या खुमासदार थट्टा यांनीं त्या वधूवरांच्या मनांवर इष्ट तो परिणाम घडवून

आणला. दुपारीं भरल्या पंक्तींत उदबत्तीच्या घमघमटाबरोबर वारणेच्या हातचा घास घेतांना नवरदेवानें तिच्यावर एक उमदा दृष्टिक्षेप टाकून ' आ' उघडला. ' ऐकू आलं नाहीं; आणखी एकदां होऊं दे ' या पंक्तींतल्या आवाजांचा त्रास न मानतां वारणेनें तीन वेगवेगळे उखाणे घेऊन त्यांत विद्याधराचें नांव गोवलें आणि आपल्या साईसारख्या मऊमऊ पांच बोटांनीं नवऱ्याला घास भरवला. ' याच ताटांत बसून पोटभर जेव कीं ' या विद्याधराच्या हलक्या आवाजांतल्या सूचनेला आपल्या गहिऱ्या कटाक्षांनीं परतवीत ती वरवर्णिनी विजेसारखी लवत, लचकत, पंक्तींतून पसार झाली.

संध्याकाळीं सगळे सोपस्कार आटपून वरात निघेपर्यंत दिवेलागणी झाली. देवघरांत सासूनें हातावर घातलेली दह्याची कवडी चाखून जांवई बाहेर आला. त्याच्या उपरण्याला वारणेच्या पदराची गांठ होतीच. किटसनचे दोन दिवे मांडवाबाहेर तयार होते आणि त्या प्रकाशांत वरातीचा घोडा फुर-फुरत उभा होता. वडीलधाऱ्या मंडळींना नमस्कार करून वारणा निघाली तेव्हां माहेरच्यांनीं डोळ्यांना पदर लावला. सासरच्यांनीं ' वाजवा रे वाजवा ' म्हटलें. ताशा फडफडला. सनईवाल्यानें कल्याण रागाची फुंक भरली. वधू प्रथम घोड्यावर चढली, नंतर नवरामुलगा तिच्यामागें बसला.

" नीट सांभाळ बरं का तिला ! " कोणी तरी विद्याधरला प्रेमाची सूचना दिली. पडत्या फळाची आज्ञा मिळतांच विद्याधरानें तिच्या कृश कटीभोंवतीं आपले भुजदंड लपेटले. वारणेच्या उभ्या पाठीला पुरता आधार मिळाला. त्या अननुभूत पुरुषी निकट स्पर्शानें पहिल्या क्षणाला तिची तनुलता दोन कोवळ्या फळांसह शिरशिरली अन् मग सुखावली.

तिच्या सैलसर आंबाड्यावर अबोलीची नाजूक, नकसूत वेणी ऐटींत बसली होती अन् तो नेमका विद्याधराच्या नाकाशीं आला होता आणि अबोलीचें फूल स्वभावतः निर्गंध असल्यामुळें तिच्या न्हालेल्या केसांचाच एकमेव मादक सुवास त्याला खूष करीत होता. त्यानें जराशी मान खालीं केली कीं त्याच्या बाशिंगाचें गोंडे तिच्या रेशमी केसांवरून इतक्या हळुवार-पणें मागेंपुढें होत होते, कीं जसे कमलकेसरावर पाय टेवणारे भ्रमरच !

त्या अडखळ वाटेवरून चालतांना घोड्याचीं पावलें विषम पडत. त्या-मुळें विद्याधराचा तोल कधीं या बाजूला तर कधीं त्या बाजूला झुके. पण

वारणा मात्र त्याच्या मिठींत सुरक्षित होती. तिला ते झोक मोठे गमतीचे वाटत. ती मनांत म्हणत होती, ' संसारांतले धक्के अन् झोले असेच सुखावह असले तर किती बरं होईल ! '

कुळवाड्यांचा वाडा ओलांडतांच त्या वरातीच्या रचनेंत शैथिल्य आलें. कांहीं लोक पुढें झाले. कांहीं धूम्रपानासाठीं मागें रेंगाळले. लग्नसमारंभांत वधूपक्षाकडून जें उणेंअधिक घडलें त्यावर बायकांनीं आपलें जिव्हास्त्र परजलें. वारणा आपल्या ओटींतले मूठमूठ तांदूळ घेऊन वाटभर पेरूं लागली.

आणि अशा त्या गैरसावध परिस्थितींत वेडा भालू एका दाट झुडपाआडून एकदम प्रगटला ! दुसऱ्याच क्षणाला वारणेचा तांदूळ पेरणारा हात त्यानें पकडला अन् खसदिशीं ओढला. वारणा किंचाळली आणि विद्याधराची मिठी सैल पडल्यामुळें जमिनीवर आली. घोडा बुजून उधळणार तोंच विद्याधरानेंहि खालीं उडी टाकली. पांगलेले लोक ' काय झालें ? ' म्हणून गोळा झाले. पाहतात तों वेडा भालू वारणेचें गोलदार अन् ' कंकण बंध ' असलेलें मनगट धरून उभा आहे आणि वारणा वावटळींतल्या कर्दळीसारखी डगमगते आहे.

आपल्या धर्मपत्नीचा तो विनयभंग पाहून विद्याधर बेफाम झाला. त्यानें आपली मूठ आवळून भालूच्या तोंडावर जबरदस्त ठोसा लगावला. भालू तिरमिरून जमिनीवर पडला. वारणेचा हात मोकळा झाला. पण तेवढ्यानें विद्याधराच्या क्रोधाचें समाधान झालें नाहीं. ' हलकट...पाजी... बदमाष...' अशा शिव्या हासडीत तो त्याला लाथाडीत सुटला. आपली लाथ कुठें बसते याचें त्याला भान नव्हतें !

प्रत्येक पदाघातला वेडा विव्हळून ओरडत होता, " नको रे मारूंऽऽ ! मेलों, मेलोंऽऽऽ "

" मर, मर. लवकर मर. तूं मेलास म्हणून जग बुडायचं नाहीं. दुसऱ्याच्या बायकोवर हात टाकतांना लाज नाहीं वाटली ? अं ? "

विद्याधराला आवरण्याचें कोणालाच सुचत नव्हतें. सगळे जणूं निर्जीव पुतळे बनले होते. झाडेंमाडेंहि स्तब्ध झालीं होतीं. निळ्या आभाळांतल्या चांदण्यांचेहि डोळे जणूं तारवटले होते. पण कोणालाच त्याची दया आली।

नसली तरी वारणेला काली. तिच्यावर त्यानें अन्याय केला होता; पण तीच त्याच्यासाठीं द्रवली. सकाळीं तिच्या जन्मदात्यानें त्याची कणीक तिंबली होती. आतां तिचा जन्माचा जोडीदार त्याला तुडवीत होता. सकाळच्या त्या माराची सूज ओसरण्याच्या आंतच हा दुसरा प्रसाद त्याला मिळत होता. तो वेडा आहे आणि म्हणूनच जगांतल्या विधिनिषेधांच्या पार गेला आहे, हें काळयाचे पांढरे झालेल्या तिच्या बापालाहि कळलें नव्हतें, तर उसळत्या रक्ताच्या विद्याधराला कुठून कळावें ? त्याच्या वेडांतल्या कृतीलाहि कांहीं अर्थ होता; पण या शहाण्यांचें वेडेंपण मात्र शंभर टक्के निरर्थक होतें. तो वेडा झाला त्या गोष्टीला तो जबाबदार नव्हता. पण आज या दोघांनीं जें केलें त्याला मात्र ते स्वतः जबाबदार होते आणि ही गोष्ट वारणेच्या मनाला फार लागली होती.

ती त्याला वांचवण्यासाठीं पुढें झाली ; पण नवऱ्याची उगारलेली लाथ तिलाच खावी लागली. खालीं बसतांबसतांच तिनें त्याच्या पायांना घट्ट मिठी घातली. विद्याधर तिच्यावर सापासारखा फुसकरला,

" तूं दूर हो. मला त्याचा पुरता समाचार घेऊं दे ! "

" मी पायां पडतें तुमच्या. एका अश्राप जिवाची तुमच्या हातून हत्या होईल अशी मला भीति वाटते. वेड्याला देवाच्या घरीं शंभर गुन्हे माफ असतात हें माझ्यासारख्या अजाण पोरीनं का तुम्हांला सांगायला हवं ! पुरें झालं आतां ! "

वारणा कळकळून बोलली. विद्याधर त्या शब्दांनीं नरमला. पुनश्च लाथ मारायला त्याचा पाय उचलला नाहीं. त्याच्या डोळ्यांतली आग विझली. प्रिय पत्नीची पहिली प्रार्थना मानण्याइतकी तरी माणुसकी त्यानें दाखविली. तो वारणेचा हात धरून मागें फिरला. पुनश्च दोघें अश्वारूढ झालीं. पुनश्च तीच मिठी वारणेच्या कमरेभोंवतीं बसली. वरमायेनें तिथलीच मूठभर माती उचलून ' इडा पिडा टळो ' म्हणून वधूवरांवरून ओवाळून टाकली. घोड्याला इशारा मिळतांच तो पुढें चालूं लागला.

भालू तसाच तिथें कण्हत पडला होता. त्याच्या अंगांत त्राण उरलें नव्हतें खरें; पण वारणा दृष्टिआड होते हें दिसतांच त्यानें साऱ्या घायाळ, मूर्च्छित शक्ती पणाला लावून एकच दीर्घ हाक मारली " वारणा ऽऽ ! "

त्या हांकेंत विश्वांतल्या करुणरसाचा अर्क सांठवला होता. सगळ्यांचेंच काळीज तिनें कांपवलें. एक क्षणभरच, पण सगळ्यांचेच पाय थबकले ! ' अरेरे ! ' कोणाचें तरी दयामय अंतःकरण उद्गारलें. वारणेचे कान तिकडे वळले; पण मान मात्र वळली नाहीं. तिला एकदां वाटलें, कीं अंतरांत असल्यानसल्या सहानुभूतींत भिजवून मुक्त कंठानें त्याला एकदां अखेरची ' ओ ' द्यावी. पण...पण...

भालू आतां पूर्वीचा भालू नव्हता, तशीच वारणाहि आतां पूर्वीची वारणा नव्हती. तिच्या स्वातंत्र्याला मर्यादा पडल्या होत्या.



# प्रादेशिक शब्दांचा कोश

अलतड, पलतड–ऐलथडी पैलथडी
अवढाणें–अरुचि
अष्टपुत्री–पिंवळें वधूवस्त्र
असकड–गवत वगैरे वाढलेली जागा
अळवाची माडी–काळ्या अळवाचा लांब कंद
आऊर–पूर
आटवल–पातळ भात
आडमेळें–विघ्न, अडचण
आडसर–शहाळें
आपरस–आंगरस
आवरा–गोळा
आळेण–पातळ पदार्थ जाड करण्यासाठीं पीठ लावतात तें
ओव्यावर बिजें–दुप्पट ओझें
आयवळें–थेंब
कडाशी–कोयती अडकवण्यासाठीं बांबूच्या पोकळ काठीला पाडलेली आडवी चीर
करंटींत गुंडे घालणें–उत्कंठेनें वाट पाहणें, दिवस मोजणें
कुकारा–दीर्घ साद.
कुडव–दोन पायल्या
कुसधुणी–शेवटचें अपत्य.
खाडूं–विरीच्या पिंजोळ्यांचें कडें
गम लागूं देणें–पत्ता लागूं देणें
गायीर–केर, शेण वगैरे टाकण्यासाठीं खड्डा
गुरंगुटी करणें–मुर्कुंड घालणें
घुमट–घागरीच्या आकाराचें मातीचें व घोरपडीच्या कातड्याच्या पुडाचें वाद्य
चाकी–चक्राकार उंच रचना
चारखंड–गरे काढून घेतलेलें फणसाचें साल
जिवस–सजीव
डाळणें–रचणें
डोळ्यांना पाणी लावणें–केल्यासारखें भासवणें
ढिगी–टेकू
तट्टा–भात ओतण्यासाठीं बांबूच्या वेळांची वर्तुळाकार उभी केलेली चटई
ताकाआधीं मीठ खाणें–अधीर होणें
तिखें–पोलाद
तुरभुरणें–बहरणें
थळ–स्थळ, देवस्थान,
दडक–पावसाची सर
धू–मुलगी
नकसूत–सुरेख
नळी तासणें–पळून जाणें
निसासा–निःश्वास

नेम—दरा, खड्डा
नेवरी—करंजी
पड—शेराएवढें माप
पडण—गत बदलून समेवर येणें
परामस—आतिथ्य
पाखला—गोरा सोजीर
पुत—मुलगा
पेंड—चार, पांच पोफळीच्या चुडतांचा भारा
फूग घालणें—तळ्यांत पाणी सांठण्यासाठीं तुंब लावणें
बंदखण—तुरुंगाची कोठडी
बेणणें—शेत किंवा बाग यांतून तण वगैरे अनावश्यक वस्तु काढून टाकणें
भिरंड—कोकंब
माग—मोठ्या पाटाला आडवा फोडलेला लहान पाट
रळ—छिद्र
रुपेकेगद—रुपेरी केवडा
रोडमाणकें—गाईच्या गळ्याखालील पोळीला होणारा रोग
वषट्कार—अभाव
वांशेल—अस्वल
शिंकाळी—गाडग्याला दोरी बांधून हातांत धरणें
शिमशेजारी—ज्याचें घर वा शेत आपल्या सीमेला लागलेलें आहे असा शेजारी
शेड—पिक्या फणसाचा कापलेला तुकडा
शेंद्री—चटई
सांकेरीं—प्रवाह अडवणारा पालापाचोळा
साडेपोवाडे—दुःखदायक भोग.
सोजी—गव्हाची खीर
सोपस्कार—उपचार
हळदीचें खांदळ—डबोलें
हुमला—तांबडा मुंगळा
हुर्मुजी—फॅशनेबल
होंकल—नवरी मुलगी
होंडका—लांकडाचा तुकडा